डिटेक्टिव्ह अल्फ़ा

# देखावा

(रहस्यकथा)

लेखक : सौरभ वागळे

sourabh238@gmail.com

sourabhwagale@yahoo.com

फोन नं- +918983234042

'मांगिरीश', आपटे मळा, कसबे डिग्रज, ता. मिरज, जि. सांगली, 416305



प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान

www. esahity. com

esahity@gmail. com

प्रकाशन : १० जुलै २०१६

# मनोगत

डिटेक्टिव्ह अल्फाचा पुढचा भाग इतक्या लवकर वाचकांसमोर ठेवू शकलो, याचा मला खुपच आनंद होतोय. याचं श्रेय जातं, ते माझ्या लेखनाच्या आवडीला आणि वाचकांच्या प्रतिसादांनी भरलेल्या माझ्या मेलबॉक्सला!! या दोन गोष्टींनी माझा पुढे लिहीण्याचा उत्साह आणखीनच वाढवला. अल्फा माझ्याइतकाच तुम्हालाही आवडला, हे पाहून खुपच छान वाटलं आणि लगेचच मी पुढच्या कथेवर काम करायला सुरुवातदेखील केली.

या कथेला सुरूवात करण्याआधी माझे शाळेतील दोन मित्र अक्षय नरदे आणि सूरज पाटील यांचा आवर्जून उल्लेख करायलाच हवा. नववी-दहावीत असताना आमच्या 'कथा आणि त्यांमधली क्रिएटिव्हीटी' या विषयावर तासनतास गप्पा चालायच्या. आम्ही खूप वाचायचो. आमच्या इचलकरंजीच्या वाचनालयात शेरलॉक होम्सची पुस्तके शोधण्यात आम्ही कित्येक संध्याकाळी घालवायचो. माझी कथा लिहीण्याची आवड त्याचवेळी बहरून आली. त्यावेळी बाकीचे सर्वजण पुर्वपरिक्षेच्या अभ्यासात मग्न असताना आम्ही चक्क 'देखावा' या कथेचा पाया रचला होता!! (आणि तरीही परिक्षेत टॉप मारले होते) तीच कथा नव्याने लिहून मी या पुस्तकात समाविष्ट केली आहे. त्या आठवणींमुळे ती कथा तशी खासच आहे. 'हरवलेली अंगठी' देखील मी बरीच आधी लिहीली होती, पण आता या पुस्तकातून तुम्हा वाचकांसमोर ठेवायला मिळाली.

शेवटी, ज्यांच्यामुळे हे घडतंय, त्या ईसाहित्य प्रतिष्ठानचे खूप खूप आभार. त्यांच्याशिवाय तुम्हाला डिटेक्टिव्ह अल्फा इतका वाचायला मिळाला नसता आणि मलाही लिहायला मिळाला नसता. आणि वाचकांचे तर विशेष आभार! त्यांचे प्रतिसादच लेखकाला नवे आणि चांगले लिहायला प्रोत्साहित करत असतात. त्यामुळे वाचत रहा आणि असाच प्रतिसाद देत रहा.

धन्यवाद!!

- सौरभ गणेश वागळे

Wholeheartedly dedicated to

My MOM & DAD

हे पुस्तक स्वतंत्रपणे आपण वाचू शकताच. पण त्या आधी जर डिटेक्टिव्ह अल्फ़ाचा आधीचा भाग वाचला तर अजून जास्त मजा येईल.

तो भाग तुम्ही खालील लिंकवर वाचू शकता.

http://www.esahity.com/uploads/5/0/1/2/501218/detective_alpha_saurabh_wagale.pdf

# अनुक्रमणिका

# 1.

पावसाळ्याचे दिवस होते. ऑगस्ट संपून सप्टेंबर सुरू झाला आणि पावसाने आपला जोर आणखीनच वाढवला. मला तसा पावसाळा फारसा आवडायचा नाही. ढगाळ आणि निरुत्साह वाढवणारे वातावरण, सर्वत्र ओल आणि चिकचिक, कुठे बाहेर पडायची सोय नाही, काही करावेसे वाटत नाही. मी तर अगदी बोअर होऊन जायचो. त्यातच नव्या कॉलेजचे नऊ दिवस संपून गाडी आता परिक्षांकडे जायला लागली होती. त्यामुळे गपचूप रूमवर बसून अभ्यास करणे हा एकच पर्याय माझ्या समोर होता. तशी मी एक जिम जॉईन केली होती म्हणा. रोज संध्याकाळी कॉलेज सुटल्यावर मी तिकडे जायचो. पण तीही बरीच लांब होती आणि जोराचा पाऊस असला तर तिकडे जाणेही रद्द व्हायचे. मला घरापासून दूर राहण्याची सवय नसल्याने रूमवर करमायचे नाही . सारखे घरी जावेसे वाटायचे. अशा परिस्थितीत मी तिथे टिकून राहण्याचे केवळ एकच कारण होते - ते म्हणजे अल्फा!!

अल्फा म्हणजे एक रंगीबेरंगी मुलगा होता. दरवेळी मला त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे नवीन नवीन रंग पहायला मिळायचे. रत्नजडित खंजिराचे प्रकरण होऊन आता महिना उलटून गेला होता. आम्ही अधेमधे त्यावर चर्चा करायचो. अल्फाची निरीक्षणे नेहमी चालूच असायची. त्याची, किंबहुना शेरलॉक होम्सची निरीक्षण निष्कर्ष पद्धत कधीकधी तो मला समजावून सांगायचा. पण माझी करमणूक त्याच्या निरीक्षणांपेक्षा त्याच्या बडबडीने जास्त व्हायची. करण्यासारखं काही काम नसेल, तर गप्पा ठोकणे हा आमचा आवडता छंद. असा एकही विषय नव्हता, ज्यावर अल्फा बोलू शकणार नाही. एखादा विषय घेऊन आम्ही एकदा बोलायला सुरुवात केली, की आमचे बोलणे तासनतास चाले. अर्थात, त्यातलं बरंचसं अल्फाच बोलायचा, हा भाग वेगळा. पण त्यात वेळ कसा जायचा, हे कळायचंच नाही.

अशीच एक शुक्रवारची ढगाळलेली संध्याकाळ होती. मी पुस्तक वाचत बसलो होतो आणि अल्फा नुसताच बसून जांभयांवर जांभया देत होता. ते वातावरण आणि त्यात अल्फाच्या जांभया, यांमुळे मलाही वाचायचा कंटाळा आला. अल्फाने अजून एक जांभई दिली.

"अकरा!!" मी पुस्तक बाजूला ठेवत म्हणालो, " आज काय एकसलग जांभयांचा रेकॉर्ड करण्याचा विचार आहे की काय!! झोप येत असेल तर सरळ झोपून टाक ना. "

"या जांभया म्हणजे झोपेचं लक्षण नाहीयेत, प्रभू. " अल्फा म्हणाला. त्याने मला हाक मारण्यासाठी आलिकडेच हे सरळ साधे सोपे नाव शोधून काढले होते, "जांभया दोन प्रकारच्या असतात - एक झोपेची जांभई आणि एक आळसाची जांभई. संध्याकाळचे साडेपाच ही काही माझ्या झोपण्याची वेळ नाहीये, हे तुला ठाऊकच आहे. त्यामुळे या सगळ्या जांभया माझ्यात भरलेल्या आळसाचे प्रतिक आहेत, असे म्हणायला हरकत नाही."

"मग जांभया देऊन आळस थोडीच जाणारे.. काहीतरी काम कर. मग जरा फ्रेश वाटेल." मी म्हणालो.

" काय करण्यासारखे आहे का, यावर मी गेला अर्धा तास विचार करतोय. पण माझा मेंदू मला सांगतोय, की तुझ्याकडे जांभया देण्याशिवाय दुसरे कोणतेच काम नाहीये. त्यामुळे शांत बस आणि जांभया देत रहा!!" अल्फा बारावी जांभई देत म्हणाला.

" अभ्यास कर ना मग. वेळ सत्कारणी लागेल." मी सुचविले.

" छे!! तो पर्याय तर मी पहिल्यांदाच बाजूला केला आहे." अल्फा मोठ्याने हसत म्हणाला.

" वा!! छानच. तुझ्यामुळे माझाही अभ्यासाचा मूड गेला." मी खिडकीपाशी जात म्हणालो. खिडकीच्या बाहेर खाली ओलसर झालेला रस्ता आणि तुरळक रहदारी दिसत होती.

"आज जिम नाहीये का तुझी? " अल्फाने विचारले.

"सकाळीच जाऊन आलो. " मी उत्तरलो.

" कॉलेजवर काही काम नाही का?? तिकडे जाणार असशील तर मीपण येतो. तुमचा कँपस भलामोठा असल्यामुळे तिकडे वेळ पटकन जातो." अल्फा म्हणाला.

" काही काम नाहीये. आज तर उलट कॉलेज रिकामं पडलंय. "

" का? कुठे गेलेत सगळे?" अल्फाने विचारले.

" तुला काहीच ठाऊक नाही असं दिसतंय." मी म्हणालो, "आज इथे जवळच एका कार्यक्रमाला बॉलीवूडची एक सुप्रसिद्ध अभिनेत्री येणार आहे. तिला पहायला माझे सगळे मित्र गेले आहेत. बऱ्याच दिवसांपासून या गोष्टीची चर्चा सुरू आहे. तुला कसं काय ठाऊक नाही कुणास ठाऊक!! "

" वा!! हे नवीनच कळालं. मी आमच्या कॉलेजला दांड्या मारत असल्यामुळे कदाचित माझ्या कानावर काही पडले नसेल." अल्फा म्हणाला, "पण आपल्याला जायला काही हरकत नव्हती. तू का नाही गेलास तुझ्या मित्रांसोबत?? "

"मला नाही बुवा आवडत हे सगळं.. काय बघायचंय त्या बाईला! तेही इतक्या गर्दीत!! त्यापेक्षा इथे शांत बसून कंटाळलेलं बरं. "

" निरसपणाचं उत्तम उदाहरण म्हणजे तू आहेस बघ प्रभू. बॉलीवूड ही करमणुकीची गोष्ट आहे. त्यात न आवडण्यासारखं काय आहे?? "

" माझ्या मते तो निव्वळ वेळेचा अपव्यय आहे. " मी म्हणालो, " मी मुव्हीज पाहत नाही असं नाही. पण फारच थोड्या मुव्हीज अशा आहेत, ज्या पाहण्यात काही तथ्य असते. एखाद्या गोष्टीवर आपण वेळ खर्च करतो, याचा अर्थ त्यातून काहीतरी उपयोगी असे आपल्याला मिळायला हवेच ना!! चित्रपट काय किंवा इतर करमणुकीची साधने काय. वेळ

घालवण्यापलीकडे ती काहीच करत नाहीत. त्यापेक्षा अभ्यास केलेला बरा. त्यातून काहीतरी आऊटपुट तरी मिळते. "

"तू तर दोन मुलांचे वडील असल्यासारखा बोलतोयस!! " अल्फा हसून म्हणाला, " प्रत्येक गोष्टीत जर तू आऊटपुट शोधत बसलास, तर तू कधी आनंदी राहू शकणारच नाहीस. मुव्हीजमधून मनाची करमणूक होते. त्यांचं कामच हे आहे, की रोजच्या धावपळीतून लोकांच्या थकलेल्या मनाला पुन्हा ताजेतवाने करणे. बरं, बॉलीवूड वगैरे जाऊदे. तू कधी निसर्गाला वेळ दिला आहेस?? हिवाळयातल्या एखाद्या सुंदर संध्याकाळचा सुर्यास्त पहा ; पावसाळयात धो धो पडणाऱ्या पावसाचे आणि ढगांच्या गडगडाटाचे संगीत ऐक. उन्हाळयातल्या पहाटेचा वारा श्वासांत भरून घे. यातून तुझ्या म्हणण्याप्रमाणे आपल्या फायद्याचे असे काहीच मिळत नाही. मिळते ते फक्त मनाचे समाधान, आनंद. शेवटी आयुष्यात हेच तर आपण शोधत असतो. मग ते मुव्हीजमधून असेल, निसर्गाच्या सानिध्यातून असेल, किंवा छंद जोपासण्यातून असेल. मनाचे सुख महत्त्वाचे. आता तू




म्हणशील, की मी भरपूर अभ्यास केला, की मला आयुष्यात हवं ते मिळवता येईल, मनाचे समाधान होईल. मी अभ्यासाला नाही म्हणत नाही. प्रत्येकाने ध्येय हे बाळगायलाच हवे आणि ते साध्य करण्यासाठी प्रयत्न करायलाच हवेत. पण ते करताना जगायलाही शिकले पाहिजे ना. विसरू नकोस प्रभू, यशस्वी होणे आणि आनंदी होणे यात खूप फरक आहे!! "

मी ते ऐकून हडबडूनच गेलो.

" वाहव्वा!! खुपच हृदयस्पर्शी होतं हे.." मी मनापासून बोललो, " तुझे नामकरण आता 'एकविसाव्या शतकातील थोर विचारवंत श्री. अनिकेत महाजन' असेच करायला हवे. "

अल्फा हसला.

" उर्फ 'अल्फा' असंही पुढे कंसात लावायला हरकत नाही. " तो डोळा मारत म्हणाला. मी स्मित केले.

"शेवटी 'आता काय करायचं' हा प्रश्न उरलाच!!" अल्फा म्हणाला. मी काही प्रतिक्रिया द्यायच्या आतच माझा फोन वाजला. तो फोन माझा क्लासमेट मितेन याचा होता.

"हां बोला महाशय, झाला का कार्यक्रम?? पाहिलं का तुझ्या आवडत्या नटीला डोळे भरून??" मी त्याला विचारले.

" होय.. झाला.. पण ते जाऊदे.. मी एका खुपच मोठ्या संकटात सापडलोय रे प्रभव. मला तुझी मदत हवीय.." त्याचा आवाज एकदम घाबराघुबरा झाला होता आणि तो धापा टाकत बोलत होता.

" काय रे? काय झालं?" मी चिंताग्रस्त होऊन विचारले.

" तू आधी इथे हॉस्टेलवर माझ्या रूमवर ये. तुला सगळं सांगतो. मला काहीच सुचेनासं झालंय रे.." तो रडवेल्या आवाजात म्हणाला.

" हे बघ, तू शांत हो. मी दोनच मिनिटांत निघतोय." मी त्याला धीर देत म्हणालो.

" लवकरात लवकर ये. आणि येताना तुझा तो रूममेट आहे त्यालाही घेऊन ये." तो म्हणाला. त्याचा आवाज जवळपास कापतच होता. त्याने अल्फाला सोबत घेऊन यायला सांगितल्यावर मला जरा विचित्रच वाटले.

" बरं ठिकाय. आलोच मी. " मी फोन ठेवला. अल्फा माझ्याकडे पाहत होता.

"चला, शेवटी काहीतरी काम मिळालंच!! " त्याचा नूर एकदमच पालटला आणि तो उत्साही दिसू लागला, "तुमच्च्या कॉलेजच्या D3 हॉस्टेलवर पोहोचण्यास फारतर पाच मिनिटे लागतील, नाही का? त्यात तुझ्या मित्राची रूम तळमजल्यावरच आहे. आपण लवकर गेलो तर तुझ्या मित्राला नक्कीच मदत करू शकू. "

मी आश्चर्याने अल्फाकडे पाहतच राहिलो.

" मी अजून तुला एका शब्दानेही काही बोललो नाहीये अल्फा!! तुला कसं कळालं की आपल्याला कुठे जायचंय?" मी म्हणालो. अल्फा हसला. मी फोनवर जे बोललो, ते पुन्हा एकदा आठवून पाहिले. मी कुणाचा फोन आहे, काय प्रॉब्लेम आहे, कुठे जायचंय, याबद्दल काहीच बोलल्याचे मला आठवले नाही.

"तुझ्या चेहऱ्यावरील बदलणाऱ्या भावांनी मला सगळे सांगितले. "अल्फा म्हणाला, " तू सुरूवातीला 'हॅलो' वगैरे काही न म्हणता थेट कार्यक्रम झाला का असेच विचारलेस. याचा अर्थ दुसरीकडून बोलणारा तुझा बऱ्यापैकी चांगला मित्र असला पाहिजे. इथे आल्यापासून माझ्याखेरीज मितेन हा तुझा चांगला मित्र झाला आहे. मग मी अंदाज बांधला, की फोन मितेनचाच असावा. पुढे क्षणातच तुझ्या चेहऱ्यावरचे भाव चिंतेचे दिसू लागले. त्याअर्थी त्याने तुला काहीतरी गंभीर गोष्ट सांगितली असावी. मग लगेचच चिंतेबरोबर तुझ्या चेहऱ्यावर मला तणाव दिसला आणि तू त्याला 'शांत हो' असे बोललास. म्हणजेच घटना जास्तच गंभीर आहे आणि ती स्वतः मितेनसोबतच घडली असावी. मग पुढच्या वाक्याला तू माझ्याकडे पाहिलेस आणि त्याला लगेच निघण्याचे आश्वासन दिलेस. म्हणजे काम फक्त तुझे नसून कदाचित मलाही तुझ्यासोबत यावे लागणार असावे. आणि रूमबद्दल म्हणशील, तर तू मागे एकदा मितेन आणि D3 हॉस्टेलच्या तळमजल्यावरील रूमबद्दल बोलल्याचे मला आठवतेय. मग सरळच आहे ना, की आपल्याला आत्ता तिकडेच जायचे असावे. "

मी थक्कच झालो.

"अल्फा, तू खरंच कधीकधी कमाल करतोस बाबा!! " मी म्हणालो.

" बरं, ते असूदे. आता निघुया का आपण? " तो जवळपास उड्याच मारत होता, " मला तर कधी एकदा तुझ्या मित्राला भेटतो असे झालेय. काहीतरी इंटरेस्टिंग घडलेलं असावं, अशी अपेक्षा करुया. "

" हो जाऊया. पण तू तुझा उत्साह जरा कमी कर आणि थोडा गंभीर चेहरा कर. मला ठाऊकाय, तुला एखादी केस मिळाली, की आनंद होतो. पण माझा मित्र बिकट परिस्थितीत दिसतोय. तुला खुष वगैरे पाहून तो बाहेरच काढेल आपल्याला!! "

" हो रे.. तू नको काळजी करू. " अल्फा त्याचे सँडल घालत म्हणाला. आम्ही कॉलेज हॉस्टेलकडे जायला बाहेर पडलो. वाटेत मी नक्की काय घडले असावे, याचाच तर्क करत होतो. पाच-दहा मिनिटांत आम्ही D3 हॉस्टेलपाशी पोहोचलो. कॉलेजच्या कँपसमध्येच, पण थोड्याशा बाजूच्या भागात हॉस्टेलच्या इमारतींची रांग होती. कॉलेज बरेच जुने असल्यामुळे हॉस्टेलच्या इमारतींचे बांधकामही दगडी व जुन्या पद्धतीचे होते. गेटमधून आत गेल्यानंतर पहिलीच इमारत D3 ची होती. त्या इमारतीला लागूनच भिंत होती आणि त्या भिंतीपलीकडे झाडांची गर्दी होती.

आम्ही तेथे पोहोचलो, तेव्हा बऱ्यापैकी अंधार पडला होता आणि दिवे लागले होते. आम्ही D3 च्या तळमजल्यावरील शेवटच्या रूमकडे गेलो. तेथे दारातच माझा मित्र मितेन आमची वाट पाहत उभारला होता.

"या.. पटकन आत या.. " तो म्हणाला. त्याचा चेहरा अतिशय भेदरलेला होता आणि तो अतिशय सैरभैर झाल्यासारखा दिसत होता. आम्ही त्याच्या मागोमाग आत शिरलो. ती रूम फार मोठीही नव्हती आणि फार लहानही नव्हती. आतमध्ये आणखी तीनजण होते. तेही चिंताग्रस्त दिसत होते. तिथल्या एका रिकाम्या कॉटवर मितेनने आम्हाला बसण्यास सांगितले.

"काय झालेय मितेन? तू इतका घाबरलेला का आहेस?? आम्हाला सर्वकाही सविस्तर सांग." मी म्हणालो.

"हो.. हो.. सांगतो.. " त्याचे श्वास वेगाने सुरू होते, " हा.. हा अल्फाच आहे ना..?? तुझा रूम पार्टनर?? "

" होय. मीच अल्फा आहे. " अल्फा म्हणाला.

" ठिकाय.. "त्याने स्वतःला शांत करण्यासाठी थोडा वेळ घेतला आणि तो बोलला, " फार मोठा हादरा बसलाय मला.. माझी मौल्यवान हिऱ्याची अंगठी चोरीला गेलीय.. "

"अरे देवा!! " मलाही धक्का बसला, " कसं घडलं हे? आणि कधी?? "

" आत्ताच.. काही वेळापूर्वी.. आम्ही त्या कार्यक्रमाला गेलो तेव्हा.. " मितेन म्हणाला, " मला काही सुचेनासं झालंय रे.. संपलोय मी आता.. "

" टेन्शन नाही घ्यायचं मितेन. शोधून काढूया आपण तुझी अंगठी. " तिथे उभारलेला एक धडधाकट मुलगा त्याला धीर देत म्हणाला.

" इतक्यात आशा सोडू नकोस, मितेन. " अल्फा म्हणाला, " आता मला अगदी पहिल्यापासून काय काय घडलं ते सांग. "

" हो.. सांगतो.. " मितेन म्हणाला, " ती अंगठी माझ्या बाबांची होती. बऱ्याच वर्षांपूर्वी त्यांनी ती बनवून घेतली होती. खुपच मौल्यवान आहे ती अंगठी.. लाखाच्या घरात किंमत असेल तिची. मला पहिल्यापासून त्या अंगठीचे आकर्षण होते. मी खुपदा त्यांच्याकडे ती मागितली ; पण त्यांनी मला कधी दिली नाही. आता पुढच्या आठवड्यात आमची फ्रेशर्स पार्टी आहे आणि त्याला मी ती घालून जाणारच, असा मी त्यांच्याकडे आग्रह धरला. शेवटी ते तयार झाले आणि जपून वापरण्याच्या अटीवर त्यांनी ती अंगठी मला दिली. गेल्या रविवारीच मी ती घरून इकडे आणली आहे आणि आज.. ती नाहिशी झाली!! "

मितेनने जोरात डोके हलवले. त्याच्या मित्रांनी त्याला धीर दिला.

" तू शेवटचं कधी पाहिलं होतंस त्या अंगठीला? आणि ती गायब झालीये, हे तुझ्या कधी ध्यानात आलं??" अल्फाने विचारले.

" मी ती अंगठी माझ्या पाकिटाच्या आतल्या कप्प्यात ठेवतो आणि ते पाकीट त्या कपाटात असते." मितेनने खिडकीजवळील एका छोट्या लाकडी कपाटाकडे बोट दाखविले, " आज त्या कार्यक्रमाला जाण्याआधी मी त्या पाकिटात अंगठी आहे ना, याची खात्रीही केली होती. मी ते पाकीट व्यवस्थित ठेवून दिलं, कपाटाला कुलूप घातलं, मग आम्ही आमच्या रूमलाही कुलूप घातलं आणि तिकडे निघून गेलो. आणि आल्यावर पाहतो तर काय - कपाटाचे कुलूप कोणीतरी फोडले होते. माझ्या छातीत एकदम धस्स झाले. मी धावतच जाऊन कपाट उघडले आणि माझे पाकिट तपासले. अंगठी गायब होती. माझ्या तर पायाखालची जमीनच सरकली..!! आम्ही खूप शोधाशोध केली, हॉस्टेलवरच्या प्रत्येकाला विचारले. पण कोणालाच काही ठाऊक नव्हते. मग शेवटचा पर्याय म्हणून प्रभवला फोन लावला. "

" तुझ्याकडे ही अंगठी आहे, याबद्दल किती जणांना ठाऊक होते? " अल्फा.

" माझ्या रूममेट्स व्यतिरिक्त कोणालाच नाही. " मितेन म्हणाला, " मी मुद्दाम ही गोष्ट कोणालाच सांगितली नव्हती. कारण अंगठी मौल्यवान होती आणि त्यात मी ती बाबांच्या इच्छेविरुद्ध इथे आणली होती. त्यामुळे मी फक्त माझ्या रूममेट्सना ती दाखविली होती. "

" यातले कोण आहेत तुझे रूममेट्स? " तेथे उपस्थित असलेल्या मुलांकडे पाहत अल्फाने विचारले.

" हे तिघेही माझे रूममेट्स आहेत. " मितेनने दाखविले, " हा विकास, हा नितीन आणि हा करण. "

विकास आणि नितीन मध्यम बांध्याचे, सुमार उंचीचे आणि सुटसुटीत असे दिसणारे होते. करण सडपातळ आणि चांगलाच उंच होता. त्या तिघांचेही चेहरे चिंतीत आणि थोडे घाबरलेले दिसत होते.

" हे तिघेही आमच्याच गावचे आहेत आणि माझे पहिल्यापासूनचे मित्र आहेत. " मितेन म्हणाला.

" तुमचं गाव कुठलं?? " अल्फाने विचारले.

" विटा. इथून तास-दिड तासाच्या अंतरावर आहे. आम्ही एकमेकांच्या चांगले ओळखीचे असल्यामुळे आम्ही एकत्रच ही रूम घेतली." मितेनचा मित्र नितीन म्हणाला.

"तुम्ही तिकडे कार्यक्रमाला गेलात किती वाजता आणि परत कधी आलात? "

" आम्ही साधारण तीनच्या सुमारास गेलो आणि सहा वाजता परत आलो. " करण बोलला.

" पूर्ण कार्यक्रमात तुम्ही एकत्रच होता का? "

" नाही. आम्ही एकत्र गेलो. पण तिथे इतकी गर्दी झाली होती, की कोण कुठे आहे हे कळालेच नाही. शेवटी येताना पुन्हा एकत्र जमलो आणि परत आलो. "

" ते ठिकाण किती लांब आहे इथून? " अल्फाने प्रश्नांची सरबत्ती सुरूच ठेवली.

" ऑटोने साधारण दहा मिनिटांच्या अंतरावर आहे. " विकास म्हणाला.

" अच्छा. " अल्फाने मान डोलावली, " मितेन, तू म्हणालास, की तू आलास तेव्हा तुझ्या कपाटाचं कुलूप तुटलेलं होतं. मग रूमच्या कुलूपाचं काय? तेही तुटलेलंच होतं का?? "

" नाही. रूमचं दार आहे त्या अवस्थेत कुलूपबंद होतं. " मितेन उत्तरला.

" आँ!! हे कसं शक्य आहे?? " मी चकित होऊन विचारले, " मग अंगठी चोरणारा दार न उघडता आत कसा आला?? "

" दुर्दैवाने हे शक्य आहे. " मितेन म्हणाला, " या हॉस्टेलचे दरवाजे असेच आहेत की कुलूप न काढताही ते उघडले जाऊ शकतात!! "

" ते कसं काय बुवा?? " मी तोंडात बोटच घातले.

" या हॉस्टेलचे दरवाजे खूपच जुने आहेत. आमच्या दरवाजाला कुलूप लावलं तरी दार घट्ट बसत नाही. थोडं पुढेमागे केलं की कुलूप तसंच राहतं, पण कडी निघते आणि दार उघडतं. जसं उघडता येतं, तसंच ते बंदही करता येतं. आम्ही आलो तेव्हा ते पहिल्यासारखं बंद अवस्थेत होतं. त्यामुळे कोणी रूममध्ये येऊन गेलं असलं, तरी कळायला मार्ग नाही. "

" हं. " अल्फा विचार करीत म्हणाला, " ही दाराची भानगड भलतीच इंटरेस्टिंग आहे. मला जरा दाखवशील का?? हे कसं घडतं ते?? "

" हो. बाहेर चला. " मितेन म्हणाला. आम्ही रूमच्या बाहेर आलो. ते दार जुन्या पद्धतीच्या दारांसारखे दोन भागांचे होते आणि त्यांना मधोमध कडी होती. मितेनने दोन्ही दारे ओढली आणि त्यांना बाहेरून कुलुप घातले. मग दोन्ही दारांना आतल्या बाजूने धक्का दिला. मधले कुलूप तसेच राहिले, पण दार उघडले.

"वा!! काय कलाकृती आहे!! " अल्फा स्तिमित होऊन म्हणाला, " हे दार असे उघडते, याबद्दल सर्वांनाच ठाऊक आहे का? "

" नाही, सर्वांना नाही. पण आम्हा चौघांना तरी ठाऊक आहे. बाकी कोणाला ओघात बोललो असलो, तर आणखी कोणाला याबद्दल माहिती असण्याची शक्यता नाकारता येत नाही. " मितेन उत्तरला.

अल्फाने त्या दाराची तपासणी केली.

" थोडक्यात काय, तर चोराला आत शिरण्याचे फुकट तिकीटच मिळाले, असे म्हणायला हरकत नाही. आता मला जरा आतले कपाट पाहू दे. "

आम्ही आत गेलो. ते कपाट खिडकीपासून एक हातभर अंतरावर होते. अल्फाने त्या कपाटाचे निरीक्षण केले. त्याचे छोटेसे कुलूप तुटून बाजूला पडले होते. अल्फाने ते हातात घेऊन नीट पारखले.

" चिखल!! " तो पुटपुटला, " यावर टोकदार दगडाने घाव घालून हे तोडण्यात आलंय. तुम्ही आल्यावर इथे फार हलवाहलव नाही ना केली?? "

" नाही. वस्तू आहे त्या जागी तशाच आहेत. " मितेन म्हणाला. अल्फाने थोड्याशा समाधानाने मान डोलावली. त्याने कपाट उघडले आणि त्याच्या दाराचे निरीक्षण केले. मग त्याने खिडकी न्याहाळली. बराच वेळ तो त्या खिडकीच्या गजांकडे पाहत होता. कदाचित त्याला काहीतरी खटकले असावे, असे मला वाटले. त्याचा चेहरा थोडा त्रासल्यासारखा वाटला. मग त्याने थोडे इकडेतिकडे पाहिले. तो रूमच्या बाहेर गेला आणि त्याने दरवाजाचे आणि व्हरांड्याचे सखोल निरीक्षण केले. मग तो परत आत आला आणि त्याने खिडकीतून बाहेर पाहिले. तो थोडा गोंधळात पडल्यासारखा वाटत होता.

"इकडे मागच्या बाजूला काय आहे? " त्याने विचारले.

" थोडी झाडी आहे आणि त्यापलीकडे खेळाचे ग्राऊंड आहे. " मितेन म्हणाला.

" इकडे मागच्या बाजूला जाता येईल का आपल्याला?? "

" हो येईल ना. बाजूच्या भिंतीवरून उडी मारून जावे लागेल. " मितेन.

" चल, जाऊन पाहुया. " अल्फा म्हणाला.

" चोराने खिडकीतून चोरी केली, असं वाटतेय का तुला?? " मी विचारले.

" हां, तशी शक्यता आहे. " अल्फा उद्गारला. आम्ही रूमच्या बाहेर पडलो आणि त्या इमारतीच्या बाजुच्या भिंतीपाशी आलो. फार काही उंच नव्हती ती भिंत. फारतर कंबरेपर्यंत होती आणि त्यावरून उडी मारून जाणे सहज शक्य होते. त्या भिंतीवर आणि खाली पायात कसलीतरी पांढरी पावडर पडली होती. अल्फाने ती थोडीशी चिमटीत घेतली.

"रस्त्यावर रेषा आखण्यासाठी वापरण्यात येणारी फक्की. " तो पुटपुटला.

" परवाच कॉलेजमधले रस्ते नवीन केले आहेत. त्यावर रेषा मारून उरलेली फक्की त्यांनी इथे आणून टाकलीये." करण म्हणाला.

"अच्छा. " अल्फा हलकेच म्हणाला. मी, अल्फा आणि मितेन त्या भिंतीवरून उडी मारून हॉस्टेलच्या मागच्या बाजूला आलो. मागे सर्वत्र अंधार होता. आम्ही मोबाईलची बॅटरी सुरू केली. आमच्या बाजूला तुरळक झाडी होती आणि पायांखाली ओलसर गवत होते.

" आहाहा.. पावसाळा आणि चिखल.. माझे अगदी जवळचे मित्र!! " अल्फा खाली वाकून गवताला न्याहाळत म्हणाला.

" काही निशाण मिळतायत का? " मी विचारले.

"हो. जमिनीला थोडासा ओलसरपणा असल्यामुळे गोष्टी थोड्या सोप्या झाल्यात. "अल्फा उत्तरला. आम्ही सगळयात कोपऱ्यातील मितेनच्या रूमच्या मागे गेलो. तिथे पोहोचताच अल्फा एकदम म्हणाला, "तो बघ, कपाटाचे कुलूप फोडण्यासाठी वापरण्यात आलेला दगड!!"

खिडकीच्या बाजूला बॅटरीच्या प्रकाशात आम्हाला खाली एक दगड पडलेला दिसला. त्याच्या टोकावर आपटण्याचे निशाण होते. अल्फाने तो उचलला. त्यावर पांढरट डाग असलेले मी पाहिले.

" यावर असलेला चिखल पाहता हा इथूनच उचललेला आहे, असे दिसतेय. " अल्फा आजूबाजूला पाहत म्हणाला. त्याने तो रुमालात गुंडाळून व्यवस्थित खिशात ठेवून दिला.

रूमची खिडकी तशी जमिनीपासून उंच होती. आम्हाला खिडकीच्या खाली एक मोठा दगड ठेवलेला दिसला.

" यावर चढून त्याने अंगठी चोरली तर.. " मितेन त्रासिकपणे म्हणाला. अल्फाने त्या दगडाचे निरीक्षण केले. मग तो मला म्हणाला,

" प्रभू, एक सेकंद माझा मोबाईल पकड. "

मी त्याचा मोबाईल हातात धरला. तो त्या दगडावर चढला आणि खिडकीतून हात घालून कपाट उघडण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा काही हात तिथवर पोहोचला नाही. मग तो खाली उतरला.

" आता तू चढून पहा बघू. कपाटाच्या कुलूपापर्यंत हात पोहोचतो का तुझा ते. "

त्या दगडावर मी चढलो आणि खिडकीतून हात घातला. मी अल्फापेक्षा बऱ्यापैकी उंच असल्याने माझा हात जेमतेम कुलूपापर्यंत पोहोचला.

" पोहोचतोय ना? शाबास! " अल्फा म्हणाला. मग तो मितेनकडे वळला, " तुला पक्की खात्री आहे का, की तू अंगठीबद्दल फक्त तुझ्या रूममेट्सनाच सांगितलेयस?? "

" हो. मी त्याबद्दल दुसऱ्या कोणालाच काही बोललो नाहीये. " मितेन विचार करत म्हणाला.

" तुझे रूममेट्स कितपत विश्वासार्ह आहेत? " अल्फा.

" मी त्या तिघांनाही शाळेत असल्यापासून ओळखतो. ते माझे खूप चांगले मित्र आहेत. मला त्यांच्यापैकी कोणी चोरी केली असेल, तर विश्वास बसणार नाही. पण अंगठीबद्दल ठाऊक असणारे ते तिघेच आहेत. त्यामुळे मला आता काहीच समजेनासं झालंय. "

" ठिकाय. फार विचार नको करूस." अल्फा म्हणाला. "चला पुढच्या बाजूला जाऊ.
"

आम्ही पुढे हे तिघे थांबले होते, तिथे आलो. अल्फाने दुरूनच मितेनच्या रूमकडे पाहिले. तो कसल्यातरी खोल विचारात बुडालेला दिसत होता आणि त्याच्या मनात फार मोठी उलथापालथ होत असावी, असे त्याच्या चेहऱ्यावरून दिसत होते.

" रूमकडे चला. " तो म्हणाला. आम्ही परत मितेनच्या रूमबाहेर आलो. तिथे अल्फाने पुन्हा दाराचे आणि व्हरांड्यातल्या फरशीचे निरीक्षण केले. अखेर त्याने विचारले,

" तुमची रूम तळमजल्यावरील शेवटची आहे, बरोबर ना? "

" हो." मितेन उत्तरला.

"आणि तुमच्या रूमपलीकडे बाथरूम आहे, असं दिसतंय. "

" होय. प्रत्येक मजल्याच्या शेवटाला बाथरूम आहे - त्या पूर्ण मजल्यावरील रूम्स साठी. "

अल्फाने थोडा विचार केला.

" तू या तिघांना तुझ्या अंगठीबद्दल कधी सांगितले होतेस ते आठवतेय का? म्हणजे, दिवसाच्या कोणत्या वेळी? "

" मी गावाहून आल्याच्या रात्री त्यांना मी अंगठीबद्दल सांगितले. दहा - अकरा वाजले असतील रात्रीचे. "

अल्फाने फक्त मान डोलावली. काही क्षण शांततेत गेले.

" मितेन, आता एक काम करूया. खालच्या मजल्यावरील तुझ्या मित्रांना भेटवशील का मला? तुझ्या बऱ्यापैकी ओळखीचे असणारे?? तुझ्या रूमवर येतात असे?? "

" हो. चालेल. " मितेन कबूल झाला, " पण अंगठी मिळेल ना? मला खूपच भीती वाटतेय. जर अंगठी नाही मिळाली, तर माझे बाबा मला घरात घेणार नाहीत..!! "

" मिळेल, मिळेल. थोडी वाट पहा. " अल्फा म्हणाला, " प्रभू, तू या तिघांसोबत मितेनच्या रूमवरच थांब. आम्ही थोड्या वेळात येतोच. "

मी होकारार्थी मान डोलावली आणि मितेनच्या रूममेट्स सोबत आतमध्ये गेलो. अल्फा आणि मितेन तपास करण्यासाठी गेले. आम्ही साधारण अर्धा तास वाट पाहत होतो. माझी मितेनच्या रूममेट्सशी फारशी ओळख नसल्याने मी काही न बोलता शांत बसून राहिलो. ते तिघेही थोडे घाबरलेले असल्यामुळे तिथे एक तणावपूर्ण शांतता होती. मी त्या तिघांकडे पाहत चोर कोण असावा, याचा तर्क करण्याचा प्रयत्न केला. चोर त्या तिघांमधलाच असावा का? ज्याअर्थी अल्फा मितेनच्या रूममध्ये न थांबता दुसऱ्या रूम्समध्ये शोध घ्यायला गेला होता, त्याअर्थी चोर हे तिघे सोडून दुसरा कोणीतरी असावा. पण मितेनच्या अंगठीबद्दल फक्त त्याच्या रूममेट्सनाच ठाऊक होते. मग दुसरा कोणी कशी चोरी करेल? मला तर काहीच अंदाज लागेना. विचार करता करता अर्धा-पाऊण तास गेला आणि अखेर अल्फा आणि मितेन रूमवर परतले. मितेन अजूनही गोंधळलेला दिसत होता आणि अल्फा शांत आणि विचारमग्न होता. त्याच्या चेहऱ्यावरून त्याला काही सुगावा लागला आहे की नाही, याबद्दल मला काहीच समजले नाही.

"तू काही बोलत का नाहीयेस? " मितेनने अल्फाला विचारले, " अंगठीचा काही पत्ता लागणार नाही का? आपण पोलिसांत तक्रार देऊया का?? "

" नको. त्याची काही गरज नाही. " अल्फा शांतपणे म्हणाला, " मी काही प्राथमिक अंदाज बांधले आहेत, अंगठीच्या चोराबद्दल. फक्त एकदा खात्री करून घेतो आणि तुला सविस्तर सांगतो. "

" खरंच का? तुला कोणी चोरी केलीये, हे ठाऊक आहे का?? " मितेनने आनंदमिश्रीत उत्साहाने विचारले.

" ठाऊक आहे असं म्हणता येणार नाही. पण अजून थोड्या तपासाअंती मी सांगू शकेन. " अल्फा म्हणाला, "तुला कदाचित उद्या सकाळपर्यंत वाट पहावी लागेल. पण तुला अंगठी मिळवून देण्याची हमी मी देतो."

" प्लीज लवकरात लवकर काहीतरी कर. ती अंगठी मिळाली, तर मी जन्मभर तुझा ऋणी राहीन. " मितेन काकुळतीला येऊन म्हणाला. आम्ही त्याला धीर दिला.

" चल प्रभू. आपण निघुया. मितेन, मी तुला योग्य वेळी फोन करेन. काळजी करू नकोस. " अल्फा म्हणाला. आम्ही बाहेर पडलो. थोडे अंतर चालून हॉस्टेलच्या गेटबाहेर आल्यानंतर मला राहवले नाही आणि मी अल्फाला विचारलेच,

" अंगठीच्या चोरीबाबत मला काहीच तर्क करता येत नाहीये. तू कोणत्या दिशेने विचार करतोयस? तुला नक्कीच काहीतरी धागेदोरे मिळाले आहेत, हो ना?? "

" हो, मिळाले तर आहेत. पण थोडा पाया भक्कम करायचा आहे. उगाच चुकीचा निष्कर्ष निघायला नको. त्यासाठी आणखी थोडा शोध घेणे गरजेचे आहे. " अल्फा म्हणाला.

" मला आता न फिरवता व्यवस्थित सांग, तू या प्रकरणात कुठपर्यंत आला आहेस ते. मला फार काळ उत्सुकता ताणून धरणे जमत नाही बुवा. " मी बेचैन होऊन म्हणालो.

" बरं, ठिक आहे. मी या प्रसंगाचा कोणत्या टप्प्यांत विचार केला आणि कोणत्या निष्कर्षाप्रत पोहोचलो, हे थोडक्यात तुला सांगतो. " अल्फा म्हणाला, " मितेनने ती अंगठी गेल्या रविवारी इथे आणली होती, म्हणजे पाच दिवसांपूर्वी. त्याने त्या अंगठीबद्दल फक्त त्याच्या तीन रूममेट्सना सांगितले होते - विकास, नितीन आणि करण. बाकी कोणालाच त्या अंगठीबद्दल काहीही ठाऊक नव्हते. साहजिकच मी प्रथम त्या तिघांकडेच मुख्य संशयित म्हणून पाहत होतो. कारण पाच दिवस हे मितेन अंगठी कुठे ठेवतो, कधी आणि कशी ठेवतो, हे जाणून घेण्यासाठी पुरेसे होते. त्यात ते कुलूप घातल्यानंतरही उघडणारे विचित्र दार. चोर मोकळीक कधी मिळतेय, याची वाटच पाहत असावा आणि काल त्या कार्यक्रमाला

हॉस्टेलवरचे सर्वचजण गेल्यामुळे त्याचे फावले. तो सर्वांसोबत तिकडे गेला, गर्दीत हरवल्याचा बहाणा करून परत हॉस्टेलमध्ये आला, अंगठी चोरली आणि परत कार्यक्रमाला गेला. अगदी सोप्पं!!

मग त्या तिघांतला नक्की चोर कोण? मी दरवाजा आणि व्हरांड्याची थोडी तपासणी केली. मला तिथे एखाद्या पांढरट पावडरचे कसलेतरी डाग पडलेले दिसले. ते कसले आहेत, हे पाहण्याचा मी प्रयत्न केला, पण मला सुरूवातीला काही ध्यानात आले नाही. मग ते बाजूला ठेवून मी कपाटाची आणि त्याच्या कुलूपाची तपासणी केली. मला त्या कुलूपावर थोडा चिखल दिसला. म्हणजे ज्या दगडाने ते कुलूप फोडण्यात आलंय, तो चिखलातून उचलण्यात आला होता. पण हॉस्टेलच्या इमारतीसमोर किंवा आजूबाजूला कुठेच चिखल दिसत नव्हता. मग मी खिडकीतून मागच्या बाजूला पाहिले. तिथे चिखल होता. मी खिडकीच्या गजांचेही निरीक्षण केले. त्यावरही थोडा चिखल लागला होता. याचा अर्थ असा होता, की चोरी समोरच्या दारातून नाही, तर खिडकीतून झालीय. आश्चर्याची गोष्ट होती खरी. मी तर चोर दारातूनच आला आहे, असे धरून चाललो होतो. पण तिथले निशाण काही वेगळंच सांगत होते. पण मग प्रश्न उभा राहतो, की दारातून येणे इतके सोपे असतानाही चोराने खिडकीतून का चोरी केली?

याचा केवळ एकच अर्थ असू शकतो - चोर हा मितेनचा रूममेट नसावाच. त्याला ठाऊकच नसावे, की त्या रूमचे दार असेच किल्लीशिवाय उघडते. त्याशिवाय त्याने खिडकीतून अंगठी चोरण्याचा नसता खटाटोप केला नसता. जर चोराने खिडकीतून चोरी केली असेल, तर मग मागच्या बाजूला काही सुगावे मिळण्याची शक्यता होती. त्यामुळे मी मागे जाऊन तपास करण्याचे ठरविले. तेव्हाच मला तेथील भिंतीजवळ पांढरी फक्की पडलेली दिसली आणि मितेनच्या रूमच्या दारावर आणि व्हरांड्यात ते पांढरे डाग कसले होते, याचा उलगडा झाला. पण हे डाग तिथे कसे? अजून एक नवीन प्रश्न!! इथून चढून गेलेला कोणीतरी मितेनच्या रूममध्ये गेला असावा. त्याशिवाय तिथे पांढरे डाग उमटणे शक्य नाही. ठोस उत्तर मिळेनासे झाल्यावर मी पुन्हा तो प्रश्न बाजूला ठेवला आणि मागे काय मिळते, ते

पाहण्यास सुरूवात केली. तेथे मला नुकतेच कोणीतरी येऊन गेल्याचे निशाणही मिळाले आणि तो दगडही मिळाला. त्या दगडावरही पुसट पांढरे डाग होते. थोडक्यात, चोर इथे आला होता आणि खिडकीतूनच त्याने कपाट फोडले. मी खिडकीतून कपाट उघडण्यासाठी किमान उंची किती लागते, याचा अंदाज लावण्यासाठी तुला तेथे चढायला लावले. तुझा हात कुलूपापर्यंत पोहोचत होता. म्हणजेच, चोरी करणारा किमान तुझ्याइतक्या उंचीचा असला पाहिजे, असा मी आडाखा बांधला.

पण शेवटी एक प्रश्न शिल्लक होताच - जर चोरी खिडकीतून झाली असेल, तर मितेनच्या रूमच्या दरवाजावर आणि व्हरांड्यात त्या भिंतीवरील फक्कीचे डाग कोठून आले?? चोर भिंतीवरून जाताना चोराच्या चपलांना, हातापायाला ती पांढरी फक्की लागणार, हे उघडच आहे. पण ते निशाण दरवाजाजवळ आणि व्हरांड्यात नसायला हवे होते. कारण चोर दरवाजातून गेलाच नव्हता. त्याचे काम एवढेच, की पाठीमागच्या बाजूने येणे, अंगठी चोरणे आणि आल्या वाटेने परत जाणे. मग दरवाजावरील डागांचे रहस्य नक्की काय होते?? "

आम्ही हॉस्टेलच्या चिंचोळया रस्त्यावरून कॉलेजच्या इमारतीपाशी आलो. अल्फा न थांबता बोलतच राहिला,

" मी माझ्या मेंदूला थोडासा ताण दिला आणि माझ्या सर्वकाही ध्यानात आले. मी चोराबद्दल निष्कर्ष काढायला जरासा चुकलो होतो. याचे कारण, तो निष्कर्ष मी त्या प्रसंगाचा अर्धवट विचार करून काढला होता. चोर रूमच्या मागील बाजूस नक्कीच आला होता आणि त्याने खिडकीतून हातही घातला होता; पण अंगठी चोरली नाही..!! "

मी बुचकळयात पडलो.

" म्हणजे?? "

" म्हणजे, " अल्फा म्हणाला, " मी मघाशी म्हणालो, त्याच्या बरोबर उलट चित्र वास्तवात होते. चोराची उंची तुझ्यापेक्षा जास्त नव्हे, तर तुझ्यापेक्षा कमी असली पाहिजे.

त्यामुळे त्याचा हात कपाटापर्यंत पोहोचू शकला नाही आणि म्हणूनच तो पुन्हा पुढच्या बाजूला गेला आणि त्याने दरवाजातून आत प्रवेश केला. तो पुन्हा भिंतीवरून चढून गेल्यामुळे त्याच्या चपलांचे डाग दारावर आणि व्हरांड्यात आपल्याला मिळाले. त्याला दार विना चावीचे उघडते, हे ठाऊक नव्हते ; पण थोडा प्रयत्न करता त्याच्या लक्षात आले असणार. मग तो आत गेला, कुलूप फोडले, अंगठी मिळविली आणि दार होते तसे परत लावून तो तिकडे कार्यक्रमाच्या ठिकाणी गेला. सबंध हॉस्टेल रिकामे असल्यामुळे त्याला हे सगळे उपद्व्याप करण्यासाठी मोकळे रान मिळाले. मला खात्री आहे की असंच घडलेलं असणार आहे. त्याशिवाय ते पांढरे डाग दोन्हीकडे आढळून आले नसते. "

" ओहोहो.. सुपर्ब!!" मी एकदम उत्साहित होऊन म्हणालो, "असं आहे तर!! "

"बघ ना.. एका छोट्याशा गोष्टीकडे दुर्लक्ष केले आणि बरोबर उलटा निष्कर्ष निघाला!!" अल्फा उद्गारला, "आता शेवटचे आणि सर्वात अवघड काम शिल्लक होते - गुन्हेगार शोधणे!! चोर जर मितेनचा रूममेट नसेल, तर आख्ख्या हॉस्टेलवरचा कोणीही असू शकत होता, किंवा बाहेरचाही.. मग त्याला शोधायचे कसे? आणि त्यातच, मितेन म्हणाला की त्याच्या अंगठीबद्दल फक्त त्याच्या रूममेट्सनाच माहीत होते. मग बाहेरचा कोणी कशी चोरी करेल? मितेनही त्याबद्दल कोणाला काही बोलला नव्हता आणि त्याचे रूममेट्सही शपथेवर सांगतायत, की त्यांनी चुकूनही कोणाकडे त्या अंगठीचा उल्लेख केलेला नाहीये. शेवटी एकच शक्यता उरते - मितेनने जेव्हा त्याच्या रूममेट्सना अंगठीबद्दल सांगितले, तेव्हा कदाचित बाहेरून कोणीतरी ऐकले असावे. मितेनच्या रूमच्या पलिकडे कोपऱ्यात पूर्ण तळमजल्यावरील राहणाऱ्या मुलांसाठी बाथरूम आहे. त्यामुळे रात्रीच्या वेळी जेव्हा मितेन त्या अंगठीबद्दल सांगत होता, तेव्हा बाथरूमला आलेले कोणीतरी बाहेर उभारून त्याचे बोलणे ऐकले असण्याची शक्यता नाकारता येत नाही, असा मी विचार केला.

म्हणून मी प्रथम तळमजल्यावरील मुलांवरून नजर फिरवण्याचे ठरवले. त्या भिंतीवरील फक्कीच्या पांढऱ्या डागांचे निशाण चोराच्या अंगावरील एखाद्या वस्तूवर मिळू शकतील, या आशेवर आम्ही एका एका रूममध्ये जाऊन पाहू लागलो. ज्याअर्थी चोराला

अंगठी पाकिटात आहे आणि ते पाकिट कपाटात आहे, एवढी माहिती होती, त्याअर्थी चोर मितेनच्या ओळखीचाच असला पाहिजे आणि त्याची मितेनच्या रूमवर ये-जा असली पाहिजे असे मी गृहीत धरले. आम्ही खालच्या मजल्यावरील रूम्समध्ये एक एक करून गेलो आणि अखेर मला हवे ते मिळाले!! "

" काय सांगतोस?? " मी स्तिमित होऊन म्हणालो, " म्हणजे चोर कोण आहे, हे तुला ठाऊक आहे तर!! "

" असे म्हणता येईल. मला एके ठिकाणी पांढरे निशाण मिळालेत खरे. पण आत्ताच त्याच्यावर 'चोर' असा शिक्का मारायची घाई करायला नको. थोडी आणखी माहिती काढणे गरजेचे आहे. त्यामुळे तू थोडा धीर धर. उद्या सकाळपर्यंत सगळं काही काचेसारखं पारदर्शक होईल बघ. "

" मग आत्ता काय करणार आहेस तू? "

" आत्ता तू जेवण वगैरे आवरून रूमवर जा. मी थोड्या वेळाने येईन. " अल्फा म्हणाला.

" आणि तुझे जेवण?? "

" मी नंतर जेवून घेईन. आता तू जा पाहू. तू समोर असलास, की सतरा शंका विचारतोस आणि माझ्या विचारांच्या गाडीला ब्रेक लावतोस. त्यामुळे मी माझ्या कामाला जातो आणि तू रूमवर जा. "

" बरं बरं!! 'चालता हो' म्हणायची फारच सभ्य पद्धत आहे ही. " मी जरा रागानेच म्हणालो, " जातो मी."

" मग..! मी आहेच मुळी सभ्य!" अल्फा हसायला लागला, "चल भेटू नंतर. आणि मला वेळ झाला तर वाट नको पाहू. झोपून जा."

"हो. " मी म्हणालो आणि मेसच्या दिशेने चालू लागलो.

***



# 2.

त्या दिवशी अल्फा रात्री उशिराच आला. मी त्यावेळी जवळपास पेंगतच होतो आणि तोही इतका कंटाळला होता, की काही सांगण्याच्या मूडमध्ये दिसत नव्हता. त्यामुळे आमचं अंगठीच्या विषयावर काही बोलणंच झालं नाही. दुसऱ्या दिवशी मात्र मला जाग आली, ती अल्फाच्या गदागदा हलविण्याने.

"प्रभू उठ!! उठ लवकर.. "

मी डोळे किलकिले करून घड्याळाकडे पाहिले. आत्ताशी सात वाजले होते.

" काय रे!! एवढ्या लवकर उठून कुठल्या युद्धाला जायचेय!! आज सुट्टी आहे. झोपू दे.. "

" अरे, आपल्या रूमवर एक पाहुणा येणार आहे. आठ वाजता. त्याला तू घोरत पडलेला दिसलास, तर बरं दिसणार नाही! "

" कोण हा पाहुणा म्हणायचा? " मी आळोखेपिळोखे देत विचारले.

" मितेनच्या अंगठीचा चोर!! " अल्फा म्हणाला. ते ऐकताच मी एकदम ताडकन उठून बसलो.

" क्काय?? अंगठीचा चोर?? आणि तोही इथे येतोय?? "

" होय. आज या प्रकरणाचा शेवट करायचाय. तू मला सगळी हकिकत सारखी विचारत असतोस ना? आता त्याच्या समक्षच ऐक. तू झोपलास तर पुन्हा सांगणार नाही हां मी!! " अल्फा म्हणाला.

" छे छे!! आता कसला झोपतो मी.. " मी उठून उभा राहिलो, " म्हणजे चोर कोण आहे, यावर तू शिक्कामोर्तब केलंस तर.. "

" हो.. कालच. "अल्फा उद्गारला, " आता तू पटापट आवरून घे पाहू. तासाभरात तो येईलच. "

आम्ही आवरून घेतले आणि आठला पाच मिनिटे असताना खुर्चीवर येऊन बसलो.

" बरं, आता सांग तो आहे तरी कोण?? आणि इथे यायला तयार कसा झाला?? " मी कुतूहलाने विचारले.

" तो तुमचा वर्गमित्रच आहे. तुझी त्याच्याशी कितपत ओळख आहे, याची मला कल्पना नाही. पण तोंडओळख तरी नक्की असणार आहे. त्याला मी फार काही सांगितलेलं नाहीये. मी प्रभवचा मित्र आहे आणि थोडं महत्त्वाचं काम आहे, आठ वाजता प्रभवच्या रूमवर ये इतकाच निरोप दिलाय मी त्याला. येतच असेल तो. हा बघ आलाच. "

पायऱ्यांवरून कोणीतरी चढत असल्याचा आवाज आला आणि मग दार वाजले.

" हां अमित, ये आत. " अल्फा म्हणाला.

एक मध्यम उंचीचा, कुरळया केसांचा, थोडासा सावळा, पण चेहऱ्यावरून शांत वाटणारा मुलगा आतमध्ये प्रवेशला. अमित सावंत!! मला धक्काच बसला. तो माझ्या ओळखीचा होता आणि माझ्याच वर्गात होता. त्याच्याकडे मी आत्तापर्यंत एक अबोल आणि शांत मुलगा म्हणून पाहत होतो. त्याने अंगठी चोरली असावी, यावर माझा विश्वासच बसेना. अल्फाने काही चूक तर केली नाही ना??

"बस. " समोरच्या रिकाम्या खुर्चीकडे हात करत अल्फा म्हणाला. तो बसला. तो गोंधळलेला दिसत होता. एका अनोळखी मुलाने एवढ्या सकाळी आपल्याला रूमवर का बोलावले असावे, हे त्याला उमगत नव्हते. आमच्या रूमवर तो प्रथमच आला होता. त्याने इकडेतिकडे पाहिले. माझ्याकडे पाहून तो हलकेच हसला.

"सुट्टीच्या दिवशी तुला सकाळी इथे बोलावलं. आल्याबद्दल धन्यवाद!! " अल्फा म्हणाला, " कामच असं आहे, की मला तुला इथे बोलवावंच लागलं. "

" अच्छा. " तो संभ्रमाने म्हणाला.

" तू प्रभवला ओळखत असशीलच ना?? " अल्फाने विचारले.

" हो. अलिकडेच ओळख झाली आहे. " तो म्हणाला.

" प्रभव म्हणाला, की तू फार मितभाषी आहेस म्हणून. " अल्फा म्हणाला. मी हे कधी म्हणालो, ते आठवायचा प्रयत्न करू लागलो.

" हो. काहीसा आहे. " आता तो थोडा बेचैन झाला, " काय काम होतं ते सांगशील का?? "

" हो सांगतो ना. छोटासाच निरोप आहे तुझ्यासाठी. " अल्फा शांतपणे म्हणाला, " तुझ्याकडे असलेली मितेनची हिऱ्याची अंगठी त्याला परत कर, एवढेच सांगायचे होते तुला."

ते ऐकल्यावर मात्र अमित पार उडालाच. तो खुर्चीवरून पडता पडता वाचला. क्षणात त्याच्या शरीराला कंप सुटला आणि तो घाबरून आमच्याकडे पाहू लागला.

" अरे सांभाळ स्वतःला. मी तुझ्यावर बंदूक रोखल्यासारखा का करतोयस!! त्याला जरा पाणी दे रे प्रभू. "

मी बाटलीतले थोडेसे पाणी ग्लासमध्ये काढून त्याला दिले. तो ते प्यायला. पाण्याचा ग्लासही त्याच्या हातातून पडणारच होता; पण त्याने तो कसाबसा धरला.

" काय? कळालं का मी काय सांगितलं ते? मितेनची अंगठी त्याला परत देऊन टाक. " अल्फा कणखर आवाजात म्हणाला.

" तू.. तुला काय.. काय माहित.. की. अंगठी.. म्.. माझ्याकडे.. कशावरून.. " तो असंबद्ध बडबडला.

" थांब, थांब. तू एरवीही जास्त बोलत नाहीस. त्यामुळे आत्ताही फार बोलण्याचे कष्ट घेऊ नकोस. मी सगळे काही सांगतो. फक्त काही चुकलं, तर मला दुरूस्त कर, ठिकाय?? " अल्फाने बोलण्यास सुरूवात केली, " तू मुळचा लातूरचा. बारावीपर्यंत तिथेच शिकलास. तुझे वडील बस कंडक्टर म्हणून काम करतात आणि घरची परिस्थिती तशी बेताचीच आहे. तू बारावीला चांगला अभ्यास केलास आणि त्यामुळे तुला वालचंद कॉलेजला अॅडमिशन मिळालं. इंजिनिअरिंग कॉलेजची फी तशी मोठीच ; पण केवळ तुझी इच्छा आहे, म्हणून तुला तुझ्या वडिलांनी इथे अर्धी फी भरून अॅडमिशन घेऊन दिले आणि तू इथे आलास. तुझ्या मितभाषी स्वभावामुळे तुझे फारसे मित्र झाले नाहीत. पण प्रभव, मितेनसारख्या मुलांबरोबर तोंडओळख झाली. तू इथे बऱ्यापैकी रुळलास.

कॉलेज सुरू होऊन दोन महिने झाले आणि लायब्ररीने शिल्लक फी भरण्याचे फर्मान काढले. कॉलेजची उरलेली पंधरा हजार रुपये फी भरली नाही, तर परीक्षेला बसू देणार नाही, असे तुम्हाला सांगण्यात आले. आधीच कॉलेजच्या फिमुळे तुझ्या घरी ओझे वाढले होते आणि त्यात ही अचानक निघालेली नोटीस.. तरीही तुझ्या वडीलांनी काहीतरी करून पंधरा हजार रुपये पाठवून दिले. पण ती फी भरायच्या आतच तुझे पाकिट हरवले आणि त्यासोबत त्यातले पंधरा हजार रुपयेही गेले. आता मात्र तू जाम घाबरलास. पैसे हरवले, असे घरी सांगण्याची सोय नव्हती. इथे कोणाकडून उसने घेण्यासारखे तुझे मित्रही नव्हते. रक्कम मोठी होती. त्यामुळे तू परिस्थितीच्या कचाट्यात चांगलाच सापडलास. फी भरण्यासाठी तुझ्यासमोर कोणताच पर्याय शिल्लक राहिला नव्हता. तेव्हाच, योगायोगाने तू त्या रात्री मितेनच्या रूमबाहेरून जात असताना त्याचे बोलणे ऐकलेस आणि तुझ्या मनात वेगळेच विचार येऊ लागले. मितेनची अंगठी चोरली, तर त्यावर तुला पैसे मिळू शकणार होते. त्यामुळे तुझी पावले आपसूकच या मार्गाकडे वळली आणि तू अंगठी चोरण्याचा बेत आखू लागलास. काल सांगलीत बॉलीवूडमधील अभिनेत्री येणार असून त्या कार्यक्रमाला हॉस्टेलवरची सर्व मुले जाणार असल्याचे तुला समजले. याइतकी चांगली संधी तुझ्यासाठी दुसरी कोणती असूच शकत नव्हती.

मग तू सर्वांबरोबर कार्यक्रमाला जाण्याचा बहाणा केलास आणि सर्वांच्या नकळत परत हॉस्टेलवर येऊन अंगठी चोरलीस. सुदैवाने तुला कोणी पाहिले नव्हते. पण मी पाहिले - रूमच्या दारावर आणि खिडकीवर असलेले पांढरे डाग पाहिले. ते डाग हॉस्टेलच्या इमारतीच्या बाजूच्या भिंतीवर होते, जिथून चोर गेला होता. मी तुझ्या रूममध्ये आलो, तेव्हा तुझ्या चपलांवर मला पांढऱ्या डागांचे पुसट निशाण दिसले. तेच तुझ्या शर्टाच्या बाहीलाही होते. मग माझ्या डोळयांसमोर गुन्हेगार म्हणून तू उभा राहिलास. मी मितेनला तुझ्याबद्दल विचारले तेव्हा तो म्हणाला, की तू मितेनच्या बऱ्यापैकी ओळखीचा आहेस आणि कधीकधी मितेनच्या रूमवर येत असतोस. ते ऐकताच मी तुझ्याबद्दल जास्त खोलात जाऊन चौकशी करायचे ठरवले. तेव्हा मला तुझ्या रूममेटकडून ही सारी माहिती मिळाली. या सगळ्या गोष्टींमधून हे स्पष्टच होत नाही का, की अंगठीची चोरी तुच केली आहेस..!! आता तुच सांग, मी जे बोललो, ते खरं आहे की नाही ते. "

हे सर्व ऐकत असताना अमितचा चेहरा क्षणाक्षणाला पडत चालला होता. अल्फाने आपले बोलणे संपविल्यावर अखेर त्याला रडूच कोसळले.

"अमित, आता रडण्याने गोष्टी सुधारणार नाहीयेत. तू चूक केली आहेस आणि ती कबूल करण्याखेरीज तुझ्याकडे दुसरा कोणताच मार्ग नाहीये." अल्फा म्हणाला.

"होय.. चुकलो मी.. " शेवटी हुंदका आवरत अमित बोलला, " तू जे सांगितलेस, ते सर्व खरे आहे. मीच अंगठी चोरली आहे.. माझ्यावर परिस्थितीचा दबाव होता रे.. मी तरी काय करणार होतो..!! माझ्यासमोर हा एकच मार्ग होता.. आणि तोच मी निवडला.. "

त्याच्या डोळयांतून घळाघळा अश्रू वाहू लागले.

" तुझ्या दृष्टीकोनातून तू निवडलेला मार्ग योग्य असेल, पण त्या मितेनचे काय? त्याची काल काय अवस्था झाली होती, हे ठाऊकाय का तुला?? दुसऱ्याला खड्ड्यात घालून जर तुझी समस्या सुटणार असेल, तर त्याला काहीही अर्थ नाही. "

" माझा त्याला संकटात टाकण्याचा हेतू नव्हता.. त्या अंगठीवर मला माझे पैसे मिळतील आणि थोड्या दिवसांत काटकसर करून पैसे जमवून ती अंगठी पुन्हा सोडवून त्याला देता येईल, असा मी विचार केला. कारण त्याला थेट अंगठी किंवा पैसे देण्याबद्दल विचारले असते, तर त्याने कधीच मला दिले नसते.. कोणीच दिले नसते... आणि पैसे हरवल्याचे माझ्या वडिलांना सांगण्याइतकी हिंमत माझ्यात नव्हती..." अमित मुसमुसत म्हणाला.

" हे बघ. पहिली गोष्ट म्हणजे आता तू मित्र बनवायला शिक. चांगले मित्र असले, की कोणत्याही संकटाला सामोरे जाण्याची शक्ती आपल्याला मिळते. दुसरी गोष्ट, काहीही होऊदे, कितीही मोठं संकट येऊदे, चांगला मार्ग सोडायचा नाही, हे कायम डोक्यात ठेव. वाईट मार्ग सोपा वाटेल, तुझ्या समस्येचे तात्पुरते निरसन करेल; पण शेवटी तुला पुन्हा संकटातच टाकेल. आता तू चुकला आहेस. पण यातून धडा घेऊन पुढे कसे वागायचे, हे ठरव. "

अमितने अश्रू पुसले.

" होय. मी तणावाखाली येऊन फारच दुर्दैवी कृत्य केले आहे. मी गुन्हेगार आहे. मला मितेनही माफ करणार नाही आणि माझे वडीलही माझे काही ऐकून घेणार नाहीत. आता मी काय करू हे तुच सांग. तू जे सांगशील, ते मी करायला तयार आहे. "

" आता पहिला जे काम करशील, ते म्हणजे मितेनला जाऊन सर्व सत्य सांग आणि त्याची अंगठी त्याला परत दे. अंगठी तू चोरली आहेस, हे जाणून तो दुखावला जाईल, पण आता त्याला इलाज नाही. तू स्वतः चूक कबूल करतोयस, हे पाहून तो तुला माफ करेलही कदाचित. आणि तुझ्या फीबाबत म्हणशील, तर ते आत्ताच तुझ्या वडीलांना सांगू नकोस. आपण काहीतरी व्यवस्था करुया. माझे इथे भरपूर मित्र आहेत आणि त्यांच्याकडून थोडे थोडे करून आपण हे पैसे उभे करू शकतो. पण ते वेळेवर परत करण्याची जबाबदारी तुझी. "

" खरंच असं होऊ शकतं?? " त्याचा आपल्या कानांवर विश्वासच बसत नव्हता, " मला तुझे आभार कोणत्या शब्दांत मानू, हेच कळेनासं झालंय. पैशांची काही काळजी करू नकोस. मी काटकसर करेन, पै पै साठवून ते तुला परत करेन. हीच माझ्यासाठी योग्य शिक्षा आहे. आणि मी तुला वचन देतो, की असं काही माझ्या हातून पुन्हा कधीही घडणार नाही."

"तुला तुझ्या चुकीची जाणीव झाली, हीच माझ्यासाठी समाधानाची गोष्ट. " अल्फा म्हणाला, " आता पहिला जा आणि मितेनला भेट. फार वेळ दवडू नकोस. तो बिचारा पहाटेपासून माझ्या फोनची वाट पाहत असेल. "

"हो, हो. लगेच जातो." अमित उठला. त्याने भरल्या डोळयांनी अल्फाशी हात मिळवला, "खूप खूप धन्यवाद... तू खरंच ग्रेट आहेस अल्फा..."

"अरे चल रे. आता इमोशनल नको होऊस. जा पाहू. सर्वकाही व्यवस्थित होईल. " अल्फा म्हणाला. तो निघून गेला.

मीही तो प्रसंग पाहून थोडा गलबलून गेलो. अल्फाने अमितसारख्या मुलाला ज्याप्रकारे हाताळले होते, ते खरंच कधी कोणाला जमले नसते. हे सर्व झाल्यानंतर अल्फा काही न घडल्यासारखा आपल्या रोजच्या दिनक्रमात हरवून गेला. नंतर कळाले, की अमितने मितेनला त्याची अंगठी परत केली आणि मितेनने त्याला माफही केले. मितेनचा अल्फाला धन्यवाद सांगण्यासाठी आलेला फोन अल्फाने घेतलाही नाही. अल्फाला आभाराचे शब्द ऐकायला आवडायचे नाहीत, हे मला ठाऊक होते. त्याच्या वतीने मीच ते धन्यवाद स्वीकारले. नंतर त्या प्रकरणाचा विषय काढताच अल्फा केवळ एवढंच म्हणाला,

"पुढच्या वेळी कोणी बॉलीवूडची नटी येणार असेल, तर पहिला मला सांगायचं. समजलं?? "

***

# 1.

"उठ! उठ रे झोपाळू प्राण्या.. उठ!! "

अशीच एक शनिवारची दुपार होती. दुपार कसली, संध्याकाळच म्हणा ना. पाच वाजायला आले होते. सूर्याने लाल रंग धारण करायला घेतला होता. मी अल्फाला गदागदा हलवून उठवित होतो. त्याची 'वामकुक्षी ' आज जरा गरजेपेक्षा जास्तच वेळ झाली होती. अल्फा म्हणजे चालता बोलता कुंभकर्णच! एकदा झोपला की झोपला! त्यामुळे मला नेहमीच त्याला उठविताना कष्ट पडायचे.

"काय रे! झोपू दे ना! " अल्फाने वैतागून कूस बदलली, " मी झोपलो की तुझ्या डोळ्यांत नेहमी खुपायला लागतं बाबा प्रभू.. "

" हो का? बरं बरं. मग प्रधान सरांना सांगू का, की मी एकटाच येतोय आणि अल्फा झोप काढण्यात मग्न आहे म्हणून? "

प्रधान सरांचे नाव काढताच अल्फा स्प्रिंगसारखा टुमकन उठून बसला.

" अरे देवा, विसरलोच होतो की मी! किती वाजलेत? " त्याने प्रश्न केला.

" पावणेपाच. " मी शांतपणे उत्तरलो. ते ऐकताच अल्फाने बेडवरून खाली जवळपास उडीच मारली.

" काय तूपण ना प्रभू! लवकर उठवशील की नाही जरा. " त्याने पळत जाऊन तोंड धुतले.

" हं! लवकर म्हणे! अर्धा तास झाला उठवतोय. आता ढोल बडवायचेच काय ते बाकी होते. " मी निर्विकारपणे म्हणालो. अखेर दहा मिनिटांनी महाशयांचा आवराआवरीचा

कार्यक्रम झाला आणि आम्ही बस स्टॉपच्या दिशेने चालू लागलो. प्रधान सरांनी खरे तर शार्प पाच वाजता बस स्टँडवर येण्यास सांगितले होते. पण अल्फाची झोप! शेवटी उशीर झालाच. श्री भालचंद्र प्रधान- सांगली जिल्ह्याचे माजी पोलीस अधीक्षक. अल्फाचे गुरू. अल्फा त्यांच्याबद्दल बरेच काही सांगायचा. पण त्यांना भेटायची ही माझी पहिलीच वेळ होती. मंगळवारी त्यांचा अल्फाला फोन आला होता -

'या शनिवारची संध्याकाळ राखून ठेव. आपल्याला जयसिंगपूरला जायचे आहे. माझ्या एका घनिष्ठ मित्राची पंच्याहत्तरीची पार्टी आहे आणि त्याने आवर्जून तुला सोबत घेऊन येण्यास सांगितले आहे. त्यामुळे शनिवारी संध्याकाळी पाच वाजता तयार रहा. कुठे कडमडू नकोस आणि दुपारी झोपू तर अजिबातच नकोस! '

माझ्या मित्राने त्या सूचना अगदी 'तंतोतंत' पाळल्या, ती गोष्ट वेगळी. अखेर उशिरा का होईना, पण आम्ही बस पकडण्यासाठी जायला निघालो. या प्लॅनमध्ये मी अंतर्भूत होण्याचे कारण म्हणजे अल्फाचा आग्रह! त्याने फोनवर प्रधान सरांना मला न विचारताच सांगून टाकले, "सर, माझा नवीन रूममेट तुम्हाला भेटण्यास उत्सुक आहे. त्यालाही येताना सोबत घेऊन येतो."!!

झालं. मग माझा वीकेंडला घरी जाण्याचा प्लॅन रद्द झाला आणि मी 'बिनबुलाए मेहमान' सारखा एका अनोळखी माणसाच्या पंच्याहत्तरीला जाण्यासाठी रूमवरच थांबलो. मला हा प्लॅन मुळीच आवडला नव्हता. पण अल्फा ऐकायला तयारच नव्हता.

" तुला जरा हे विचित्र नाही का वाटत, अल्फा? " मी शेवटच्या क्षणी कटता येते का, ते पाहण्यासाठी विचारले, " ते कोण महाशय पंच्याहत्तरीचे आणि त्यांची पार्टी तरी कसली.. माझी ओळख ना पाळख. मी येण्याचे मुळातच काही कारण नाहीये. मी इथूनच इचलकरंजीची बस पकडून घरी जाऊ का? "

" गपचूप उभा रहा. " अल्फा एखादी बस येतेय का, ते पहात म्हणाला, " मला ठाऊकाय तू घरी जाऊन काय करणार आहेस ते. कुठल्यातरी जाडेल्या पुस्तकात डोके खुपसून

बसशील. त्यापेक्षा चल माझ्यासोबत. मला हा पार्ट्या वगैरे प्रकार जाम बोअर होतो बुवा. एकतर कोणाशी ओळख नसते आणि माझ्या वयाचे तेथे कोणीच नसते. त्यामुळे तू बरोबर असलास, की जरा वेळ चांगला जाईल. "

अखेर बस आली आणि आम्ही सांगली बस स्थानकाकडे निघालो.

" प्रधान सर येऊन थांबले असतील. " मी म्हणालो. ते आम्हाला स्टँडजवळ पिकअप करणार होते, "तुझ्या झोपेने विलंब केला."

अल्फाने एक मोठ्ठी जांभई दिली.

" झोप झोप झोप! " अल्फा म्हणाला, " देवाने आयुष्यात जर कुठली सुंदर गोष्ट बनविली असेल, तर ती म्हणजे झोप आहे, प्रभू. शांत झोप म्हणजे सुखाची निशाणी. मला तर एकवेळ जेवायला दिले नाही तरी चालेल, पण झोप मात्र भरपूर पाहिजे. त्यातच दुपारची झोप तर कधीतरीच आपल्या नशिबी असते. त्यामुळे मी आज तर मस्त ताणून दिली बाबा! आणि झोप आरोग्याला किती चांगली आहे, हे काही सांगायला नकोच. "

" हो, पण झोप माणसासारखी असावी. तुझ्या झोपेला झोप मुळीच म्हणता येत नाही. " मी म्हणालो.

" उलट तीच तर खरी झोप आहे! " अल्फा म्हणाला, " भरपूर झोपण्याचे फायदे ठाऊक आहेत का तुला? मोठी झोप घेतल्याने तब्येत तर चांगली रहातेच, शिवाय एक असे सर्वेक्षण आहे, की मोठी झोप तुमची स्मरणशक्तीदेखील वाढविते. झोपेमुळे तुमचे 'ग्रास्पिंग' वाढते, म्हणजेच तुम्ही जागेपणी एखादी गोष्ट शिकण्याचा प्रयत्न करीत असाल, तर जास्त झोप घेतल्यामुळे तुम्ही ती गोष्ट लवकर शिकू शकता. जास्त झोपल्याने आपले आयुष्य वाढते. याखेरीज तुम्ही कमी झोपलात, की तुमच्या शरीरातील हानिकारक प्रोटिन्सची लेव्हल वाढते, ज्यामुळे ब्लड प्रेशर आणि हार्ट अॅटॅकसारख्या समस्या उद्भवू शकतात. झोपेत तुमचा विस्कटलेला मेंदू पुन्हा व्यवस्थित होतो, ज्यामुळे तुमची कल्पकता वाढते. शिवाय तुम्हाला

वजन नियंत्रित ठेवायचे असेल, तर उत्तम झोप हवीच हवी. आणि ही गोष्ट तर तुला आवर्जून सांगायलाच पाहिजे, की भरपूर झोप काढली, की परिक्षेत चांगले ग्रेड्स मिळतात असेही अभ्यासकांना दिसून आलेय. त्यामुळे तू दिवसरात्र जागरण करून जो अभ्यास करतोस, तो अगदीच निरर्थक म्हणायला हवा. त्याऐवजी निवांत ताणून देत जा- माझ्यासारखी! "

अखेर मी अल्फासमोर हात जोडले.

" चूक झाली महाराज, माफ करा! " मी म्हणालो. 'झोपेचे फायदे' या विषयावर लांबलचक बडबड ऐकण्यापेक्षा अल्फाला झोपेतच ठेवणे जास्त सुखकर होते, " इथून पुढे आपल्याला झोपेतून उठविण्याची घोडचूक चुकूनही करणार नाही! "

अल्फा हसला, " चला. म्हणजे तुला मुद्दा तरी पटला. माझी बडबड वाया गेली नाही म्हणायची."

आम्ही काही मिनिटांतच बस स्टँडवर उतरलो. बाजूच्या चौकात एक रुबाबदार शेव्हरोलेची गाडी उभी होती. आम्ही तिच्या जवळ जाताच आतून एका वैतागलेल्या वृद्धाने खिडकीतून डोके बाहेर काढले.

"अरे काय करत काय होता इतका वेळ? " त्यांचा आवाज करडा होता आणि त्याला एक वेगळीच धार होती. चेहरा सुरकुतलेला, पण तेजस्वी होता. डोळे पाणीदार होते. हेच ते अल्फाचे गुरू - श्री. भालचंद्र प्रधान. "मला वाटलं आता शंभराव्या वाढदिवसालाच येताय की काय थेट! "

" सॉरी सर.. थोडा डोळा लागला होता. "अल्फा म्हणाला. ('थोडा' या शब्दावर मी भुवया उंचावून अल्फाकडे पाहिले.)

" हं.. वाटलंच मला. नेहमीचंच आहे तुझं. बसा आत पटकन. "

क्षणातच आमची गाडी जयसिंगपूरच्या दिशेने धावू लागली.

" हा प्रभव, सर. माझा नवा रूममेट. " अल्फाने माझी ओळख करुन दिली.

" हॅलो. अल्फा नेहमी सांगत असतो तुझ्याबद्दल. " प्रधान म्हणाले, " गेल्या आठवड्यात परिक्षा होती वाटते तुमची. "

" अं.. हो. परवाच संपली आहे, सर. मिड - टर्म एक्झाम. " मी म्हणालो.

" अच्छा. तळवलकर जिमला गेला नाहीस बरेच दिवस म्हणून विचारले. संध्याकाळी सहाची बॅच, बरोबर ना? "

" अं.. होय. तुम्हीही येता का तिथे? दिसला नाहीत कधी. " मी विचार करीत म्हणालो.

" नाही रे. या वयात तिसऱ्या मजल्यावरील जीममध्ये येऊन कसला व्यायाम करतोय मी! त्यामुळे तुला तेथे पाहण्याचा तर सवालच उपस्थित होत नाही. ते तर मी असंच तुझ्याकडे पाहून सांगितलं. "

" क्काय? माझ्याकडे पाहून?? " मी थक्क होऊन विचारले, " ते कसे काय? "

" फार काही खास विचार करावा लागला नाही रे यासाठी. " प्रधान सहजपणे म्हणाले, "तुझ्या हाताच्या तळव्याच्या बाजूला झालेली छोटीशी जखम बघ. त्यावरून मी हा निष्कर्ष काढला. तुझ्या दणकट शरीरयष्टीवरून हे तर दिसतेच आहे, की तू नियमित जिमला जातोस. आता सांगलीतील इतक्या साऱ्या जिम्समधून तळवलकर जिमच मला दिसण्याचे कारण म्हणजे तिथे असलेला एक खराब डंबेल्सचा सेट. त्या सेटमधील एका डंबेल्सचा कड जरा तुटका आहे. त्या उचलून व्यायाम करताना हाताच्या बाजूला ते तुटलेले लोखंड घासून थोडे खरचटते, जे हुबेहुब तुझ्या हातावर झाले आहे. सहाचीच बॅच का, तर तेथे संध्याकाळी सहा वाजता सर्वात जास्त गर्दी असते. त्यामुळे चांगले असलेले सेट बाकीचे लोक पटापटा घेत असणार आणि शेवटी तो खराब डंबेल्सचा सेटच तुझ्यासाठी उरत असणार. आणि बरेच दिवस तू तेथे गेला नसावास, कारण तुझ्या हातावरील जखम ताजी नाहीये आणि ती आता

भरत आलेली आहे. याचा अर्थ गेले काही दिवस तू तेथे जात नाहीयेस. मग याला कारण म्हणजे तुमची परिक्षा सुरू असावी आणि अभ्यासातून तुला वेळ मिळत नसावा. बरोबर आहे ना? "

" माईंड ब्लोईंग!!! " मला क्षणभर काय बोलावे, हे सुचलेच नाही, " अप्रतिम!! खुपच उत्कृष्ट तर्क होता हा. "

" धन्यवाद! " प्रधान स्तुती स्वीकारत म्हणाले, " मी पूर्वी काही वेळा तळवलकर जीममध्ये गेलेलो आहे. त्यामुळे तेथील थोडीफार माहिती मला आहे. "

" अच्छा अच्छा. आता मला कळतंय, की अल्फाच्या निरीक्षणशक्तीचे उगमस्थान कोठे आहे ते! " मी प्रभावित होऊन म्हणालो.

"तसं काही नाहीये. एखादी कला कोणाच्यात तयार करता येत नाही. ती उपजतच असते. त्यामुळे अल्फाच्या निरीक्षणशक्तीचे श्रेय मला तरी जात नाही."

" हा तुमचा मोठेपणा म्हणायला हवा." मी म्हणालो, "मी अल्फाकडून तुमच्याबद्दल खूप काही ऐकले आहे. तुम्हाला भेटण्यास मी खूपच उत्सुक होतो, सर."

" पण आज नक्कीच नसशील, होय ना? " प्रधान सरांनी मिश्कीलपणे विचारले, "वीकेंडला घरी जाण्याऐवजी जर एखाद्याला अनोळखी माणसाच्या पार्टीला ओढून नेले, तर त्याला ते नक्कीच आवडणार नाही."

"नाही नाही, तसं काहीही नाहीये सर. " मी थोडासा ओशाळून म्हणालो. माझ्या चेहर्‍यावरचे भाव इतके बोलके झालेत की काय, असा मला प्रश्न पडला.

" काही हरकत नाही रे. स्वाभाविकच आहे. " प्रधान सर म्हणाले, "हा अल्फा असाच नेहमी कटकट करतो का तुझ्यामागे? तसं असेल तर सांग. मी तंबी देऊन ठेवतो त्याला."

"करतो. पण आता सवय झालीये." मी अल्फाकडे पाहून डोळा मारला.

" चांगली गोष्ट आहे. " प्रधान म्हणाले, " आणि आज इतकंही बोअर होणार नाही तुम्हाला. आपण जिकडे निघालोय, ती जागा रहदारी आणि शहराच्या गजबजाटापासून आलिप्त अशा एका ठिकाणी आहे. त्यामुळे तुम्हाला आजूबाजूच्या निसर्गात मुक्तपणे फिरायला वाव आहे. काळजीचे काही कारण नाही. "

" आपण चाललोय तरी कुठे? " अल्फाने विचारले.

" आपण श्री मिरासदार यांच्या फार्महाऊसवर जाणार आहोत. मी तुम्हाला मिरासदारांबद्दल काहीच सांगितले नाही, नाही का! " प्रधान म्हणाले, " सांगलीतले एक मोठे व्यापारी आणि माझे घनिष्ठ मित्र- माधव मिरासदार. खूपच श्रीमंत माणूस. सुरुवातीला बेदाण्यांचा व्यापार करायचे. त्यात प्रगती करत करत आता बरंच काही उभं केलेलं आहे. अगदी साधा आणि सरळमार्गी माणूस. तुम्हाला नक्कीच तो आवडेल. "

चला, निदान कोणाच्या वाढदिवसाला निघालो आहोत, हे तरी कळालं, मी मनात म्हटलं. सांगलीपासून ते ठिकाण फारसं लांब नव्हतं. अर्ध्या तासाने, जयसिंगपूर गाव सोडल्यानंतर आमची गाडी मुख्य रस्ता सोडून एका वळणावर वळली. आता वाहनांची वर्दळ मागे राहिली आणि आम्ही ओसाड माळरानाच्या मधून जाणाऱ्या एका छोट्या रस्त्यावरून जाऊ लागलो. दिवस लहान असल्यामुळे सर्वत्र अंधारून आले होते. त्यात रस्त्यावर दिवे नाहीत. त्यामुळे आमचा वेग मंदावला. आजूबाजूला मध्ये मध्ये शेते लागत होती, पण बराचसा भाग ओसाडच होता. वस्ती फारच कमी होती. मधूनच शेतात दडलेले एखादे घर आम्हाला दिसायचे. अखेर, त्या रस्त्याने बरेच अंतर कापल्यनंतर आम्ही एका टोलेजंग फार्महाऊससमोर येऊन थांबलो. अंधूक प्रकाशात आम्हाला त्या फार्महाऊसवर लिहिलेले दिसले - 'देखावा'.

आम्ही गाडीतून खाली उतरलो.

***

# 2.

"वा! भारीच आहे बंगला.. " अल्फा त्या बंगल्याकडे पाहत म्हणाला. आम्ही गेटच्या दिशेने चालू लागलो. तितक्यातच एक चाळीशी ओलांडलेला तरुण आमच्याकडे येत म्हणाला,

"या या, प्रधानजी. उशीर केलात.."

"हो. निघायलाच थोडा उशीर झाला. " प्रधान म्हणाले. मी आजूबाजूला पाहिले. तेथे बऱ्याच गाड्या उभ्या होत्या आणि आतून लोकांचा गलबला ऐकू येत होता, " अल्फा आणि प्रभव, हे सचिन मिरासदार. माधवचे सर्वात लहान सुपुत्र. "

प्रधान सरांनी ओळख करून दिली. आम्ही त्यांना अभिवादन केले. त्यांची शरीरयष्टी मजबूत होती. भरघोस मिशा होत्या आणि नजरेत धार होती. त्यांनी आम्हाला आत जाण्याचा मार्ग दाखविला.

" गणपत! " त्यांनी हाक मारली. एक उंचीने लहान, किडकिडीत आणि पांढऱ्या केसांचा घरगडी धावत आला, "प्रधान साहेबांना आत ने आणि त्यांची व्यवस्था बघ जरा. मी आणखी कोणी यायचे आहे का, ते पाहतो."

"हो मालक. " गणपत म्हणाला, " या साहेब. "

आम्ही त्याच्या मागे आतमध्ये गेलो. बंगल्याच्या भोवती शोभेच्या झाडांचे आच्छादन होते. दरवाज्यावर मोठ्या अक्षरांत 'सुस्वागतम' असे लिहिले होते. आत जाताच एक मोठा हॉल होता. तेथे नुकतीच आलेली काही मंडळी गप्पा मारत होती. आम्हीही तेथे एक जागा पकडून बसलो. त्या बंगल्याची बांधणी आणि आतील फर्निचर मिरासदारांची श्रीमंतीच दर्शवित होते. भिंतीवर बरेच फोटो लावले होते. त्यांतील सर्व फोटोंमधील कॉमन व्यक्ती म्हणजे माधव मिरासदार, असा आम्ही निष्कर्ष काढला. फोटोवरून तरी तो मनुष्य

हसतमुख आणि सभ्य वाटला. आम्ही इकडे तिकडे पहात असतानाच गणपतने आम्हाला सरबत आणून दिले. आतमधून आणखी एक उंचपुरा माणूस आला आणि हॉलमध्ये बसलेल्या लोकांची विचारपूस करू लागला.

"हा विवेक मिरासदार. माधवचा मधला मुलगा. " प्रधानांनी हळूच सांगितले.

" अच्छा. "अल्फा म्हणाला, " त्यांना तीन मुले आहेत का एकूण? "

" हो. " प्रधान म्हणाले, " सर्वात मोठा आहे तो महेश मिरासदार. त्याने एमबीए केलेलं आहे आणि तो सध्या परदेशातच काम करतो. मधला विवेक, जो आत्ता तुमच्या समोर आहे. माधवचा बऱ्यापैकी व्यवहार आता तो सांभाळतो. आणि बाहेर जो आपल्याला भेटला तो सचिन, सर्वात लहान. तो पूर्वी एनसीसीमध्ये प्रशिक्षक होता. पण आता इथेच असतो. विवेकला धंद्यात मदत करतो. एकूणच सर्व मुले कामाची आहेत आणि माधव मिरासदार सध्या एक चिंतामुक्त माणूस आहे, असे म्हणायला काही हरकत नाही. "

आम्ही थोडा वेळ तेथेच बसलो. अल्फा त्या जागेचे आणि आजुबाजूच्या लोकांचे निरीक्षण करत होता, तर मी जेवणाचा मेनू काय असेल, याचा तर्क करत होतो. दुपारचे जेवण होऊन बराच काळ लोटला होता आणि मला जाम भूक लागली होती. प्रधान सर काही ओळखीच्या लोकांशी बोलत होते. बसून कंटाळा आला म्हणून आम्ही उठून त्या लांबलचक हॉलमधले शोपिसेस पाहू लागलो. काचपेटीत बरेच मेडल्स आणि ट्रॉफिज होत्या. त्यांमधल्या बऱ्याचशा मिरासदारांचा थोरला मुलगा महेश याच्या होत्या. त्या मेडल्सवरून दिसत होते, की तो बराच हुशार असावा. धाकट्याचे एनसीसीचेही काही मेडल्स होते. पण मधला मुलगा विवेक मात्र या पदकांच्या बाबतीत फार काही मजल मारू शकला नव्हता, असे दिसत होते. त्याच्या बाजूच्या कपाटात बऱ्याच प्रकारची अत्तरे, परफ्यूम्स, बॉडी स्प्रेच्या बाटल्या ओळीने मांडल्या होत्या. अल्फाने कुतूहलाने त्यांच्याकडे पाहिले.

"वा!! म्हातारेबुवांना सुगंधी द्रव्ये बरीच आवडतात, असं दिसतंय. " अल्फा म्हणाला. आम्ही टेहळणी करत असल्यासारखे फिरून पुन्हा आमच्या जागी येऊन बसलो. प्रधान सर जवळ नाहीत, हे पाहून अल्फाने आपली तोंडाची पट्टी पुन्हा सुरू केली,

" किती फसवा आहे ना 'पार्टी' हा प्रकार? सर्वांच्या चेहऱ्यावर एक कृत्रिम आनंद आहे. इथे मनापासून काही होत नसते. पार्टी देणाऱ्याचा भाव आपला आनंद सर्वांच्यात वाटावा,. हा नसून सर्वांना माझी श्रीमंती आणि मोठेपणा दाखवावा, असा असतो ; तर दुसरीकडे पार्टीला आमंत्रित करण्यात आलेल्या लोकांचा भाव पार्टी देणाऱ्याचे शुभचिंतन करणे नसून फुकटात मिळेल तेवढा पाहुणचार करवून घेणे असा असतो. "

" तू हे प्रत्येकाला लागू करू शकत नाहीस. यातले बरेचजण चांगल्या मनानेपण आले असतील. "मी म्हणालो.

" फारच थोडे! अगदी हाताच्या बोटावर मोजण्याइतके. "अल्फा म्हणाला, " आता तो बघ तो विवेक मिरासदार. किती पट्टीचा व्यापारी दिसतो. हॉलमध्ये बाकीचे कितीतरी आमंत्रित लोक बसले असतानाही मघापासून तो त्या जाड भिंगाचा चश्मा घातलेल्या गृहस्थांबरोबरच बोलत आहे. अर्थातच त्यांच्याकडून त्याला काही आर्थिक फायदा असणार. आणि ती जाडेली बाई. बघ बघ किती खोटं खोटं हसतेय. आपणही काही फार सभ्य नाहीये. मला तर त्या म्हाताऱ्याच्या पंच्याहत्तरीशी काही देणं घेणं नाहीये. जेवण फक्त झकास मिळालं, की आपण तृप्त झालो. "

" हे मात्र अगदी मनातलं बोललास बघ." मी हळूच हसत म्हणालो. अर्धा तास गेला आणि अखेर मिरासदारांचा घरगडी गणपत आम्हाला बोलवायला आला.

"हॉलमध्ये बसलेल्या सर्वांना मोठ्या मालकांनी गार्डनमध्ये बोलावले आहे. वाढदिवसाचा केक कापायचा आहे. "

सर्वजण बंगल्याच्या मागे असलेल्या गार्डनच्या दिशेने निघाले. ते गार्डन खुपच छान तयार केले होते. मधोमध एका मोठ्या टेबलावर एक भलामोठा केक ठेवला होता. त्यासमोर

बसण्यासाठी खुर्च्या मांडल्या होत्या. कोपऱ्यामध्ये मेजांवर जेवणाची पक्वान्ने ठेवलेले बाऊल्स होते. माझे पाय तिकडे ओढले गेले, पण मी स्वतःला काबूत ठेवले.

"जाम भूक लागलीय यार. " अल्फा मी जिकडे पाहत होतो, तिकडे पाहत म्हणाला.

" थोडा वेळ धीर धरा. वाळवंटातून आल्यासारखे करू नका. " प्रधान सरांनी आमचा रोख पाहून दटावले, "केक तरी कापून होऊ दे. नाहीतर लोक म्हणतील, कुठल्या उपाशांना घेऊन आले आहेत हे महाशय!"

सर्वजण गार्डनमध्ये आल्यानंतर शेवटी माधव मिरासदार तेथे येऊन पोहोचले. बेताची उंची, सडपातळ देह, डोक्यावर पांढरे केस आणि भरपूर मिशा असा एकूण त्यांचा अवतार होता. अंगावर किंमती सूट घातला होता. ते येताच सर्वांनी टाळ्या वाजवून त्यांचे स्वागत केले. मिरासदारांनी सर्वांना वाकून अभिवादन केले.

"पार्टीला आलेल्या सर्वांचे स्वागत. मी महेश मिरासदार. " एक जाडजूड आणि गोरापान मनुष्य बोलला, "माझ्या वडीलांना ओळखत नाही, असे सांगलीत फारच थोडे लोक असतील. त्यांनी मोठ्या कष्टांनी नाव कमावले आहे आणि आपल्या मनमिळाऊ स्वभावाने सर्वांना आपलेसे केले आहे. त्यांचा आज पंच्याहत्तरावा वाढदिवस. त्यांना आपण दिर्घायुष्यासाठी शुभेच्छा देऊया. त्यांनी केक कापावा, अशी माझी विनंती. "

सर्वांनी पुन्हा टाळ्या वाजवल्या. मिरासदार केक कापणार, इतक्यातच गार्डनमध्ये एक व्यक्ती प्रवेशली. उन्हाने रापलेला काळा वर्ण, धिप्पड देह, हातात तांब्याचे कडे, गळयात चेन आणि रागीट चेहरा. पेहरावावरून तरी तो मनुष्य गुंडांचा म्होरक्या वाटत होता. त्याला पाहताच, का कोण जाणे, पण सर्व मिरासदार मंडळींच्या चेहऱ्यावरचे हसू कुठल्याकुठे उडून गेले. क्षणापूर्वी सर्वांकडे पाहून स्मितहास्य करणाऱ्या माधव मिरासदारांच्या चेहऱ्यावर तो मनुष्य येताच आठ्या पडल्या. त्यांचा मधला मुलगा विवेक तर त्या माणसाकडे खाऊ की गिळू अशा आवेशात पाहत होता. त्या माणसाने वृद्ध मिरासदारांकडे पाहून हात उंचावला. मिरासदारांनी थोड्या त्रासिकपणेच त्याला हात करून सर्वांच्यात सामील होण्यास

सांगितले. तो माणूस आमच्या बाजूलाच येऊन उभारला. त्याने मारलेल्या परफ्यूमचा घमघमाट खूपच वैताग आणणारा होता. आम्ही त्याच्यापासून थोडे लांबच सरकलो. अखेर मिरासदारांनी केक कापला आणि शुभचिंतन वगैरे झाल्यानंतर आम्ही जेवणाकडे वळायला मोकळे झालो. मी तर स्वीट भरपूर वाढून घेतले आणि आम्ही जवळच्याच एका टेबलावर जाऊन बसलो. प्रधान सर मिरासदारांना भेटायला गेले. आम्ही जेवण्यास सुरूवात केली.

"वा! किती वर्षांनी जेवत असल्यासारखे वाटतेय. " मी खुष होऊन म्हणालो, " रोज मेसचे जेवण जेवणाऱ्याला पर्वणीच म्हणायची ही. "

मला इतकी वर्षे घरचे जेवण जेवण्याची सवय असल्यामुळे मेसचे जेवण मुळीच आवडायचे नाही. मग वीकेंडला कधी एकदा घरी जातो असे व्हायचे. आज घरी गेलो नसलो तरी जेवण मात्र स्वादिष्ट मिळाले, याचे मला समाधान वाटले.

" तो माणूस बघ ना. " अल्फा त्या मघाच्याच गुंडाकडे इशारा करत म्हणाला, " कोण असेल तो? तो आल्यानंतर सर्व मिरासदार कुटुंबियांच्या चेहर्‍यावरची रयाच गेली. पाहिलेस का तू? "

मी खाण्यात मग्न असल्यामुळे नुसतीच मान डोलावली.

" काहीतरी गोम नक्कीच आहे. " अल्फा म्हणाला. तेवढ्यात प्रधान सर मिरासदारांना घेऊन आमच्यापाशी आले.

" हाच का तो मुलगा? वा वा! " मिरासदार अल्फाकडे पाहत म्हणाले, " भालचंद्र नेहमी तुझ्याबद्दल सांगत असतो. आणि हा कोण? "

" हा माझा मित्र, प्रभव. "अल्फाने ओळख करून दिली.

" वाढदिवसाच्या हार्दिक शुभेच्छा, सर. " मी म्हणालो

" धन्यवाद, धन्यवाद. " मिरासदार म्हणाले, "बरं झालं तू यांना घेऊन आलास, भालचंद्र. "

" हुशार आहेत दोन्ही पोरं. " प्रधान म्हणाले.

" बरं, तुम्ही खाऊन पिऊन घ्या. संकोच बाळगू नका. " मिरासदार म्हणाले, " आणि आज रात्री तुम्ही इथेच थांबायचं आहे. "

मी आणि अल्फाने भुवया उंचावल्या.

" अरे नाही नाही. आम्ही तर रात्री जाण्याच्या तयारीने आलोय. थांबता येणार नाही. " प्रधान आढेवेढे घेत म्हणाले.

" थांब रे. रिटायर्ड माणूस तू. काय करणार आहेस लगेच घरी जाऊन? आणि तसेही उद्या रविवारच आहे. त्यामुळे या मुलांनाही हरकत नसावी. तेही आराम करतील आणि आपल्यालाही जुन्या गप्पा मारता येतील. "

" नको रे माधवा.. पुन्हा कधीतरी करू ना आपण हा गप्पांचा कार्यक्रम. आज नको. "

" पुन्हा म्हटलं की ते राहून जातं. ते काही मी ऐकणार नाही. आज रहा. सकाळी लवकर जा म्हणे. " मिरासदार आग्रहाने म्हणाले. आमच्यासमोर काही पर्यायच उरला नाही. मला लवकरात लवकर रूमवर जाऊन ताणून द्यायची होती. पण विचार केला, झोपायचेच तर आहे. मग ते इथे काय आणि तिथे काय.

" बरं बाबा. ठिक आहे. " प्रधान मिरासदारांना म्हणाले.

" शाबास. चल, जेवून घेऊ आता. आणखी काही जणांशी ओळख करून द्यायचीय तुझी. मुलांनो, तुम्हाला झोपायला जायचं असेल तेव्हा गणपतला सांगा. तो तुम्हाला तुमच्या रुमकडे नेईल. "

" हो सर. नक्कीच. "

ते निघून गेले. जेवण झाल्यानंतर तेथे फार काही करण्यासारखे उरलेच नव्हते. मग आम्ही उगीचच इकडे तिकडे करत बसलो. जेवण झाल्यानंतर बरेच पाहुणे निघून गेले. जे

थोडे लोक उरले होते, ते गार्डनमध्ये खुर्च्या टाकून गप्पा मारू लागले. आम्ही थोडा वेळ बंगल्याच्या बाहेरच्या रोडवरून फेरफटका मारून आलो. ते ठिकाण अगदीच सुनसान जागी होते. रस्त्यावर दिव्यांचा अंधुकसा उजेड होता. रस्त्यावरून अंधारात बुडालेला 'देखावा' बंगला त्या परिसरात अगदीच एकाकी वाटत होता.

"चल रे अल्फा वरती. मला झोप येतेय. " बराच वेळ गेल्यानंतर मी म्हणालो.

" थांब ना थोडा वेळ. " अल्फा म्हणाला, " झोपायचं काय रोजचंच आहे. अशा शांत वातावरणात, शहराच्या धावपळीपासून दूर तुला रोज रोज यायला थोडीच मिळणारे. "

" तू काय दुपारी मोठ्ठी झोप काढलीयेस बाबा. मला तर आठवडाभर झोप नाहीये परिक्षेमुळे. तसेही बारा वाजायला आलेत. खूप उशीर झालेला आहे. " मी डोळे चोळत म्हणालो.

" बरं. चल. "अल्फा तयार झाला, " आपल्याला आता गणपतला शोधायला हवे. "

आम्ही बंगल्याच्या गेटपाशी आलो तेव्हा समोरच गणपत दिसला. तो आणि एक तेरा-चौदा वर्षांचा पोरगा मिळून आतमधला कचरा बाहेरच्या कुंडीत टाकत होते.

" नमस्कार, काका. झाले का जेवण? " अल्फाने विचारले.

" होय साहेब, आत्ताच झाले. " तो म्हणाला.

" अहो साहेब काय म्हणताय. आम्ही तुमच्यापेक्षा लहान आहोत. मला 'अल्फा' म्हणा आणि याला प्रभव म्हणा. "

" तुम्हाला काय म्हणायचं? काही कळालं नाही. " गणपतने डोके खाजवत विचारले. मी गालातल्या गालात हसलो.

" 'अल्फा अल्फा'.. सगळेजण तसेच म्हणतात. " अल्फा म्हणाला.

" हां.. बरं बरं. " त्याने मान डोलावली. त्याच्या दृष्टीने 'अल्फा' हे नाव परग्रहावरच्या कुणाचेतरी असणार. तसा अल्फाही काही दिसायला परग्रहवासीपेक्षा कमी नव्हता. (याला कारण - त्याचे विचित्र केस!)

" आज बरीच धावपळ झाली असेल नाही, या बंगल्यावर? " अल्फाने विचारले.

" होय तर! साहेबांची तिन्ही मुलं कालच आलेली आहेत. या फार्महाऊसच्या साफसफाईपासून सगळी कामं आम्ही दोन दिवसांत केली आहेत. " गणपत म्हणाला.

" तुम्ही कधीपासून इथे काम बघता? "

" साधारण पंधरा वर्षे झाली असतील की. हे फार्महाऊस बांधल्यापसून मीच इथलं काम बघतो. मोठे साहेब म्हणजे फार चांगला माणूस. त्यांनी माझीपण इथंच सोय केली. त्यामुळे मला दुसरीकडं कुठंच जायची गरज पडली नाही. "

" अच्छा. " अल्फा म्हणाला, " काका, तुम्ही मघाशी केक कापायच्या वेळी गार्डनमध्ये होता का? तिथे एक माणूस सर्वात शेवटी आला होता - तुम्हाला आठवत असेलच की. कोण होता तो? " अल्फाने विचारले.

" तो काळा दांडगा माणूस? हातात कडी घातलेला? "

" हां, तोच. "

" तो नागेश. मोठ्या साहेबांचा पुतण्या. " गणपत आवाज खाली करत बोलला, " खरंतर मी असं बोलायला नाही पाहिजे, पण एक नंबरचा नालायक माणूस आहे बघा तो. गुंड आहे. "

" हो, ते तर दिसतच होते. " अल्फा म्हणाला, " तुमच्या साहेबांना तो त्रास देत असावा, कारण तो आल्यावर त्यांचा चेहरा चांगलाच पडला होता. "

" त्रास म्हणजे चांगलाच त्रास देतो तो. काहीही काम करत नाही. नुसता काकाचा पैसा उधळतो. आलिकडे तर खुपच करायला लागलाय तो. साहेब या फार्महाऊसवर कधीतरीच येतात. पण हा पठ्ठ्या सारखा सारखा येतो काय, मला हुकूम काय सोडतो, पार्ट्या काय करतो.. काही बोलायचं कामच नाही! "

" ते हॉलमधल्या काचपेटीतील महागडे सेंट्स आणि परफ्यूम्स तोच वापरतो वाटतं. " अल्फा म्हणाला, "मघाशी जेव्हा तो आला, तेव्हा त्याच्या अंगाला किती तीव्र वास येत होता परफ्यूमचा. "

" होय. त्या वासाच्या बाटल्यांचा भारीच नाद त्याला. सदानकदा अंगावर फवारत असतो. दरवेळी नवीन नवीन बाटल्या आणत असतो. " गणपत म्हणाला, " साहेबांची मुलंपण वैतागली आहेत त्याच्या या उधळपट्टीला. आणि का नाही वैतागणार? असा कष्टाने कमावलेला पैसा असाच कोणी उधळायला लागलं, तर एखाद्याला कसं वाटेल? "

" मग ते त्याला सरळ सांगत का नाहीत? असे मूग गिळून गप्प का बसतात? " मी विचारले.

" असं कसं सांगणार. तो शेवटी मवाली. काहीतरी धाक वगैरे दाखवत असेल आणि यांच्याकडून पैसे उकळत असेल. मी तर ऐकलंय, की आता तो मोठ्या साहेबांच्या प्रॉपर्टीचा हिस्सादेखील मागायला लागलाय. "

" बापरे! फारच वाईट. त्यावर तर त्यांच्या तीन मुलांचा हक्क जायला हवा. तरीच तो विवेक मिरासदार मघाशी नागेशकडे इतक्या रागाने पाहत होता. " अल्फा म्हणाला.

" होय ना. मध्ये एकदा विवेक साहेबांचं आणि नागेशचं भांडणही झालं होतं म्हणे. नागेशने विवेक साहेबांना दामटून गप्प बसवलं होतं. मोठ्या साहेबांचं तर आता वय झालं. ते काय करणार देवालाच माहित. " गणपत म्हणाला. त्याने त्याच्याबरोबर कचरा भरणाऱ्या

पोराकडे पाहिले आणि तो ओरडला, "संज्या.. पटपट हात हलव रे! झोपायला जायचं आहे की नाही तुला? "

त्या मुलाने नुसतीच मान डोलावली. त्या मुलाचा अवतार अगदीच वाईट होता. विस्कटलेले केस, मळलेला शर्ट, धुळीने माखलेले अंग आणि पायांत तुटक्या चपला. तोही इथे घरगडी म्हणून काम करत असावा, असा मी अंदाज बांधला.

" घरी सांगून आला आहेस ना, आज इथंच राहणार आहेस म्हणून? " गणपतने विचारले. त्या मुलाने पुन्हा मान डोलावली आणि तो भराभर बुट्टीतला कचरा डस्टबीनमध्ये भरू लागला.

" काका, आम्हाला आमची रूम दाखवता का? झोपायला जायचे आहे. " अखेर अल्फा मुद्द्यावर आला.

" हो. चला की. " गणपत म्हणाला. तो आतमध्ये निघाला आणि त्याच्या मागोमाग आम्ही निघालो.

" तो मुलगाही इथे कामाला आहे का? " अल्फाने विचारले.

" होय. संजू नाव त्याचं. इथून थोड्याच अंतरावर पुढे त्याचं घर आहे. मुका आहे बिचारा. दोन वर्षांपूर्वी तो मोठ्या साहेबांकडे काम मागायला आला आणि साहेबांनी त्याला माझ्या हाताखाली ठेवलं. थोडासा वेंधळट आणि घाबरट आहे. पण पोरगा कामाचा आहे. "

गणपतने आम्हाला आमची खोली दाखविली आणि तो निघून गेला. ती खोली खालच्या मजल्यावर होती आणि खिडकीतून गार्डनमध्ये गप्पा मारणारी मंडळी दिसत होती. खोलीच्या बाजुने वरती जाण्यासाठी जिना होता. बहुधा वरतीही रूम्स असाव्यात.

" मिरासदारांशी नागेशचे वागणे निश्चितच अयोग्य आहे, नाही का? " अल्फाने विचारले, " प्रधान सरांना याबद्दल एकदा बोलायला हवे. "

" हं. " मी उत्तरलो. मला खूपच झोप आली होती. समोर बेड दिसताच मी स्वतःला त्यावर झोकून दिले.

" अरेच्चा! गार्डनमध्ये तर म्हातारे मिरासदार दिसतच नाहीयेत. बाकीचेच लोक बसलेत. ते कुठे गेले असावेत? " अल्फा खिडकीतून बाहेर डोकावत म्हणाला.

" तुला मिरासदार दिसोत न दिसोत. मला तर समोर फक्त आणि फक्त झोपच दिसतेय. " मी जवळपास डोळे मिटतच बोललो, " गुड नाईट अल्फा. "

काही क्षणांतच मी झोपेच्या अधीन झालो. माझ्यासाठी झोपही तीच होती आणि रात्रही तीच होती. पण 'देखावा' बंगल्यासाठी मात्र ती रात्र काळरात्र बनून आली होती, याची कल्पना मला झोपताना नव्हती.

***



# 3.

रात्री उशिरा, किती वाजता कुणास ठाऊक, पण मला जाग आली. वरच्या मजल्यावरून कसलेतरी जोरजोराचे आवाज येत होते आणि बंगल्यात धावपळ जाणवत होती. मी डोळे किलकिले केले. अल्फा अजून झोपेत होता. अर्धवट झोपेत मी मोबाईलमध्ये वेळ पाहिली. रात्रीचे पावणेतीन वाजले होते. पुढच्याच क्षणी एक किंकाळी त्या बंगल्यात घुमली, जिने माझ्या डोळयांवरची झोपच उडवून दिली. मी खाडकन उठून बसलो. अल्फाही जागा झाला.

"ते काय होतं? " मी घाबरून अल्फाकडे पाहात म्हणालो. अल्फा क्षणाचाही विलंब न करता बेडवरून उतरला आणि दरवाजाकडे धावला. मीही त्याच्या मागोमाग धावलो. आम्ही जिना चढून वरती आलो. वरच्या मजल्यावर कॉरीडॉरच्या शेवटच्या खोलीसमोर बरेच लोक जमले होते. आम्ही धावतच तेथे पोहोचलो. तेथे विवेक मिरासदार आणि नागेशची झोंबाझोंबी चालली होती. विवेकने नागेशच्या शर्टाची कॉलर पकडली होती आणि तो म्हणत होता, "तू त्यांना मारलंस? तू त्यांना मारलंस?? आता मी तुला सोडणार नाही!!"

दोघे - तिघेजण त्यांचे भांडण सोडविण्याचा प्रयत्न करीत होते आणि बाकीचे खोलीच्या आत पाहत होते. प्रधानांनी सर्वांना अडवून धरले होते आणि ते ओरडत होते, "लांब रहा.. लांब रहा.. कोणीही आत यायचे नाही."

आम्ही खोलीत डोकावून पाहिले आणि माझ्या छातीत धस्स झाले.

वृद्ध माधव मिरासदार जमिनीवर पडले होते. अगदी निश्चल. त्यांच्य तोंडापाशी थोडे रक्त पडले होते. त्यांचे डोळे उघडेच होते आणि बाहेर येतील इतके मोठे झाले होते. जीभदेखील बाहेर आली होती. अतिशय भयानक असे ते दृश्य होते.

"तुम्ही दोघे जरा शांत बसा! " प्रधान ओरडले. विवेक आणि नागेश त्यांचा आवाज ऐकून थोडे बाजूला झाले.

" यानेच मारलंय माझ्या वडीलांना. ठाऊक आहे मला. " विवेक किंचाळला.

" मी पाहतोय ना? थोडा वेळ शांत बस पाहू. " प्रधान म्हणाले, " अल्फा, पोलीसांना फोन कर. "

अल्फाने दोनदा फोन लावला. पण कोणी उचलला नाही. ते पाहून प्रधान चिडले.

" झोपा काढतायत नुसते! " ते म्हणाले, " तोपर्यंत आपणच थोडी पाहणी करूया. अल्फा, तू ये इकडे. प्रभव, तू फोन लावत रहा. "

मी फोन लावता लावता प्रधान सर आणि अल्फा काय करतात ते पाहत होतो. त्यांनी मृतदेहाची तपासणी केली.

"त्यांना गळा आवळून मारण्यात आलेय. " त्यांच्या मानेभोवतालचा भाग पाहत प्रधान म्हणाले, " मृत्यू होऊन फार वेळ झालेला नाहीये. "

अल्फा संपूर्ण खोलीची पाहणी करू लागला. दरवाजाच्या बरोबर समोर एक लांब खिडकी होती आणि ती सताड उघडी होती. बाजुला एक बुटका पलंग होता आणि त्यावरची चादर खाली जमिनीवर अस्ताव्यस्त पसरली होती. दाराच्या बाजूला एक लांब जाडजूड दोर खुंटीला अडकवला होता. त्याबाजूच्या भिंतीमधल्याच छोट्या कप्प्यात एक मोबाईल ठेवला होता. जमिनीवर पडलेल्या मिरासदारांच्या तोंडालगत रक्त सांडले होते आणि रक्ताचे लाल थेंब दरवाजापर्यंत एका रेषेसारखे पसरले होते.

" खुनीने मिरासदारांचा गळा आवळण्यासाठी या चादरीचा उपयोग केलेला दिसतोय. " अल्फा त्या खोलीचे निरीक्षण करीत म्हणाला, " आणि ते करताना त्याने त्यांना जमिनीवर पाडलं होतं बहुधा. कारण मिरासदारांच्या नाकातून रक्त येतंय. त्यांचा चेहरा जमिनीवर आपटला असावा, तिथे. "

त्याने दरवाजाकडे बोट दाखविले. दरवाजाजवळ बरेच रक्त सांडले होते.

" आणि तेथून खुनीने त्यांना खेचत आतमध्ये आणले असणार. त्यामुळे हा रक्ताचा ओरखडा इथे पडलाय. "

त्या ठिकाणी आणखी एक लगेच जाणवणारी गोष्ट म्हणजे, त्या खोलीत सुटलेला परफ्यूमचा घमघमाट. अल्फाने मृतदेहाजवळ जाऊन त्याचा वास पाहिला. मग त्या बाजूला पडलेल्या चादरीचाही वास पाहिला.

" या दोन्ही गोष्टींमधून हा वास येतो आहे. " अल्फा म्हणाला, " हा 'डिझेल ' कंपनीच्या परफ्यूमचा वास आहे. आणि मला चांगलं आठवतंय, तो परफ्यूम रात्री पार्टीमध्ये तुम्हीच लावला होता, श्री नागेश मिरासदार. बरोबर आहे ना? "

" होय, मी लावला होता, पण मी खून नाही केला. देवाशप्पथ सांगतो. " नागेश ओरडला. तो खूपच घाबरलेला दिसत होता.

" खोटं बोलतोय तो.. "विवेक पुन्हा ओरडला, " सगळं तर समोर दिसतंच आहे. गेले कित्येक दिवस तू बाबांच्या मागे प्रॉपर्टीसाठी लकडा लावला होतास, हे काही आम्हाला ठाऊक नाही काय? बाबांनी तुझ्या नावे काहीही ठेवण्यास नकार दिला होता. म्हणूनच तू हे केलं असणार! आता तुला फासावर चढविल्याशिवाय मी गप्प बसणार नाहीये, हे ध्यानात ठेव. "

" डेडबॉडीला पहिल्यांदा कोणी पाहिले? " अल्फाने विचारले.

" मी बाहेर आलो तेव्हा हा नागेशच इथे उभा होता. बाबांच्या खोलीच्या दारात. " मिरासदारांचा धाकटा मुलगा सचिन पुढे होत म्हणाला. त्याचा चेहरा खूपच पडला होता आणि तो कोणत्याही क्षणी रडेल असे वाटत होते.

" तुम्ही कशाला बाहेर आला होतात? " अल्फाने विचारले.

" मला झोप येत नव्हती. मी जागाच होतो. थोड्या वेळापूर्वी मला पलीकडच्या खोलीचे दार उघडल्याचा आवाज आला आणि बाहेर हालचाल जाणवली. म्हणून मी इतक्या रात्री काय चाललंय, हे पाहण्यासाठी बाहेर आलो. तेव्हा हा बाबांच्या खोलीतून बाहेर येत होता. " सचिनने नागेशकडे बोट दाखविले.

" होय, मला मान्य आहे की मी इथे होतो, पण मी इथे येण्याच्या आधीच ते मेलेले होते. आत्ता आहेत तसेच ते जमिनीवर पडले होते. मी त्यांना थोडंसं हलवून पाहिलं, पण त्यांनी काहीही प्रतिसाद दिला नाही. म्हणून मी सगळ्या लोकांना हाक मारण्यासाठी बाहेर येत होतो. " नागेश म्हणाला. त्याच्या कपाळावरून घाम निथळत होता.

" तर श्री नागेश मिरासदार, आता मला सांगा, तुम्ही इतक्या रात्री मिरासदारांच्या खोलीत काय करत होता??" प्रधानांनी विचारले.

"त्यांनीच मला बोलावले होते. म्हणाले, महत्त्वाचे बोलायचे आहे. "नागेश म्हणाला.

" रात्री अडीच वाजता काय महत्त्वाचे बोलायचे होते त्यांना? "

" मला ठाऊक नाही. " नागेश म्हणाला, " मला त्यांचा मेसेज आला. मी झोपलो होतो. सव्वादोन वाजता मोबाईल वाजला आणि मला जाग आली. इतक्या रात्री कुणाचा मेसेज आला, हे पाहण्यासाठी मी मोबाईल पाहिला तर तो काकांचा मेसेज होता आणि त्यात त्यांनी मला लगेच त्यांच्या खोलीत येण्यास सांगितले होते."

"मला तो मेसेज दाखवाल का? " प्रधानांनी हात पुढे केला. नागेशने मेसेज दाखविला. तो असा होता -

'आत्ताच्या आत्ता माझ्या खोलीमध्ये ये. मला सगळे विषय संपवून टाकायचे आहेत. मी वाट पाहतोय. ' - माधव मिरासदार ; वेळ : 2.17 am.

तो नंबर नवीन होता.

" हा तर नवीन नंबर दिसतोय. तुमच्याकडे मिरासदारांचा नंबर सेव्ह नाहीये का? " अल्फाने विचारले.

" आहे ना.. पण त्यांनी आज पहिल्यांदाच वेगळया नंबरवरून मेसेज केला आहे. एरवी त्यांचा नेहमीच्या नंबरवरून फोन वा मेसेज येत असतो. " नागेश म्हणाला. प्रधानांनी भिंतीतल्या कपाटातील मोबाईल अलगद उचलला आणि तो तपासला.

" यात तरी त्यांनी तुम्हाला पाठविलेला मेसेज दिसत नाहीये. " प्रधान म्हणाले.

" पहा.. मी हेच सांगत होतो. मला कोणीतरी फसवतंय. मला कोणीतरी दुसऱ्या नंबरवरून मिरासदारांच्या नावाने मेसेज केला आहे आणि वरती बोलावून सापळ्यात अडकविले आहे. " नागेश म्हणाला.

" बाबांचा आणखी एक नंबर होता. " महेश मिरासदार बोलले, " ते दोन मोबाईल वापरायचे. एक सर्वांना संपर्क करण्यासाठी होता, जो आत्ता तुमच्या हातात आहे. दुसरा जो होता, तो फक्त आम्हा तीन मुलांसाठी आणि काही महत्त्वाच्या व्यक्तींसाठी होता. "

" तो दुसरा नंबर जरा सांगता का? " प्रधानांनी विचारले. महेशनी तो नंबर सांगितला.

" अगदी बरोबर! याच नंबरवरून माधव मिरासदारांनी नागेशला मेसेज केलाय. " प्रधान म्हणाले, " तो मोबाईलही इथेच कुठेतरी असायला हवा. "

" इथे आहे. " अल्फा मृत मिरासदारांच्या खिशातून एक मोबाईल काढत म्हणाला. त्याने तो मोबाईल तपासला, "यावरून मेसेज पाठविलेला दिसतोय. दोन वाजून सतरा मिनीटांनी. "

" झालंच तर मग. म्हणजे तुम्हाला माधव मिरासदारांनी स्वतःच मेसेज करून बोलावले होते, हे तरी सिद्ध झाले! म्हणजे कोणी तुमची फसवणूक केल्याचा प्रश्नच येत नाही. " प्रधान म्हणाले. त्यांनी तो मेसेज पुन्हा एकदा वाचला, " 'मला सगळे विषय संपवून

टाकायचे आहेत'.. मिरासदार कोणत्या विषयांबद्दल बोलत होते, याची तुम्हाला निश्चितच कल्पना असेल, नाही का? "

" मला.. मला नाही.. ठाऊक.. " नागेश अडखळत बोलला.

" याने कशाला सांगायला हवे! मीच सांगतो ना. " विवेक म्हणाला, " गेले कित्येक दिवस हा मनुष्य माझ्या वडीलांच्या मागे लागला होता, मला प्रॉपर्टीमधला अर्धा हिस्सा हवा म्हणून. ते नाही म्हणताच याने त्यांना धमक्या द्यायला सुरुवात केली होतीस. बाबांनी आम्हाला सांगितले होते, की माझ्या पंच्याहत्तराव्या वाढदिवसानंतर मी माझे मृत्युपत्र करवून घेणार आहे. त्यामुळे तो त्याच्या नावावर जास्तीत जास्त प्रॉपर्टी करण्यासाठी बाबांवर दबाव आणत होता. मघाशीही बारा वाजण्याच्या सुमारास हा बाबांच्या खोलीतच होता, जेव्हा आपण सर्वजण खाली होतो तेव्हा. चांगला तासभर वाद घालत होते ते दोघे. विचारा त्याला, इतका वेळ काय बोलत होता ते!! "

" तुम्ही प्रॉपर्टीबद्दलच बोलत होता ना? " अल्फाने विचारले.

" अं.. ते.. अं... होय.. " अखेर त्याने मान्य केले, " आम्ही प्रॉपर्टी संबंधीच बोलत होतो. पण खरेच सांगतो.. मी खून केलेला नाहीये. "

" तुम्ही मिरासदरांवर पैशांसाठी दबाव आणत होता, हे खरे आहे का? "

" अं.. हो. खरे आहे. " त्याने हतबल होऊन मान्य केले.

" असं दिसतंय की उपलब्ध असलेले सर्व पुरावे तुमच्या विरोधातच आहेत, श्री नागेश मिरासदार! " प्रधान म्हणाले, " विवेकने तुम्हाला खोलीतून बाहेर येताना पाहिले आहे. खून झाला त्या खोलीत आणि मृतदेहाच्या शरीराला परफ्यूमचा वास येतोय, जो वाढदिवसाच्या वेळी तुम्हीच मारला होता, हे कोणीही सांगेल. तुमचे आणि मिरासदारांचे प्रॉपर्टी वरून बऱ्याच दिवसांपासून वाद चालले होते. तुम्हाला प्रॉपर्टीमधला हिस्सा हवा होता आणि मिरासदार तो देत नव्हते. खून व्हायच्या काही तास आधी तुमची याच

गोष्टीवरून वादावादी झाली होती, हेही तुम्ही आत्ताच कबूल केले. मिरासदारांनी तुम्हाला पाठविलेला मेसेजही तुमच्या मोबाईलवर आहे. आणि एवढे सगळे समोर दिसत असूनही तुम्ही म्हणताय, की मी खून नाही केला!! हास्यास्पद आहे हे.. "

" मला मान्य आहे.. पण.. माझ्यावर विश्वास ठेवा.. मी खून नाही केला.. " नागेश पुन्हा तेच ओरडला.

" मग सिद्ध करून दाखवा. " प्रधान म्हणाले.

नागेश थोडा घुटमळला. त्याला काय बोलावे, हे सुचेना.

" मी.. मी.. " नागेश चाचपडत बोलला. मग एकदमच त्याला काहीतरी आठवले, " पण मला त्यांनी नेहमीच्या मोबाईलवरून मेसेज का नाही पाठविला? त्याऐवजी त्यांनी दुसरा नंबर वापरला.. जो ते सहसा कुणाला देत नाहीत... हे तुम्हाला विचित्र वाटत नाही का? "

" चूप बस निर्लज्ज माणसा! आता असल्या फालतू शंका काढून तू तुझे निर्दोषत्व सिद्ध करू शकत नाहीस. तुलाही मनातून ठाऊक आहे, की तूच खून केला आहेस. त्यामुळे मुकाट्याने ते मान्य कर. " विवेक म्हणाला.

" कधीच नाही! मला मान्य आहे, की मी त्यांच्याकडे प्रॉपर्टीची मागणी केली होती, त्यांनी नकार दिला होता, मग आमचा वाद झाला होता. पण मी निर्दोष आहे.. खरंच सांगतो!! " नागेश कळवळून म्हणाला. मी अखंडपणे पोलीस स्टेशनला फोन लावत होतो. अखेर तिकडून कोणीतरी फोन उचलला. मी पटकन फोन सरांकडे दिला.

" हॅलो.. मी निवृत्त पोलीस अधीक्षक भालचंद्र प्रधान बोलतोय. काय करत काय होता इतका वेळ?.. बरं ऐका ...जयसिंगपूरच्या पुढे एका फार्महाऊसवर खून झालाय. आत्ताच्या आत्ता या... होय, मी इथेच आहे... आम्ही वाट पाहतोय. "

" पोलीस येताहेत. " प्रधान सर्वांकडे पाहत म्हणाले, " आपल्याला वाट पाहण्याशिवाय गत्यंतर नाही. सर्वांनी शांत व्हा आणि हॉलमध्ये जाऊन बसा. मला कोणीही तेथून हललेलं नाही पाहिजे. नागेश मिरासदार, तुमच्यावरचा गुन्हा जवळपास सिद्ध झालेलाच आहे. आता जे काही सांगायचे आहे, ते थेट कोर्टातच सांगा. आणि पळून जाण्याचा प्रयत्न करू नका. महागात पडेल. "

सर्वजण खाली येऊन बसले. प्रत्येकजण घाबरलेला होता. माधव मिरासदार अजूनही मूकपणे अश्रू ढाळत होते. विवेक अजूनही चिडलेला होता आणि नागेशकडे रागाने पाहत होता. सचिन खुपच दुःखात दिसत होता आणि त्याने चेहरा हातांनी झाकून घेतला होता. गणपत आणि संजूही डोक्याला हात लावून बसले होते. मी खालीच थांबलो. प्रधान सर आणि अल्फा वरतीच होते आणि मिरासदारांच्या खोलीची तपासणी करीत होते. बऱ्याच वेळाने पोलीस आले, रुग्णवाहिका आली. नागेशची पुन्हा चौकशी झाली आणि त्याला पोलीसांनी नेले. मिरासदारांचे शवही पोस्ट मॉर्टमसाठी नेले गेले. हे सर्व होईपर्यंत बाहेर उजाडले. मी गार्डनमध्ये येऊन बसलो. अखेर अल्फा माझ्या शेजारी येऊन बसला. तो कसल्यातरी विचारात खोल बुडालेला दिसत होता.

"माधव मिरासदारांचे काय दुर्दैव! बरोबर पंच्याहत्तरीच्या दिवशीच काळाने त्यांच्यावर घाला घालावा!! " मी म्हणालो. तेवढ्यात गणपतने आम्हाला चहा आणून दिला.

" हं.. " अल्फाने हुंकार दिला.

" तशी साधी सरळच केस होती, नाही का? " मी चहा कपांत ओतत पुढे म्हणालो, " नागेशने खून केला आहे, हे सरळसरळ सिद्ध होत होते. त्याच्याकडे खूनासाठी पूरक असे कारणही होते. "

" हं.. " अल्फाने पुन्हा तशीच प्रतिक्रिया व्यक्त केली.

" बरं झालं तो माणूस अडकला. गुंडच दिसत होता. आणि तो ज्या प्रकारे मिरासदार कुटुंबियांना त्रास द्यायचा, ते पाहता अगदी योग्य न्याय झाला आहे त्याच्यासोबत. आता बस म्हणावं तुरुंगात खडी फोडत. "

" हं... " पुन्हा तेच. आता मात्र मी वैतागलो.

" तुला झालंय तरी काय? ऐकतच नाहीयेस माझं. कसला विचार करतो आहेस? " मी विचारले.

" सांगतो, सांगतो. थोडा धीर धर. " अल्फा म्हणाला आणि त्याने चहाचा एक घोट घेतला. तेवढ्यातच तिथे प्रधान सर आले. तेही अल्फासारखेच चिंताग्रस्त दिसत होते.

" डेडबॉडीला नेलं का? " अल्फाने त्यांना विचारले.

" हो. " प्रधान आमच्या समोर बसत म्हणाले, " डेडबॉडीला नेलं आणि नागेशलाही पोलिसांबरोबर पाठवून दिलं. "

त्यांनी अल्फाकडे हेतूपुर्वक नजरेने पाहिले. अल्फानेही प्रधान सरांकडे पाहिले. मी चक्रावून ते दोघे असे का करताहेत, हे पाहू लागलो. अखेर प्रधान सर अल्फाला म्हणाले,

" मला वाटतं आता खऱ्या गुन्हेगाराचा शोध घ्यायला सुरुवात करण्यास काही हरकत नाही..!!! "

***

# 4.

" आँ?? काय म्हणालात?? " मी तर जवळपास उडालोच, " खरा गुन्हेगार म्हणजे? काय म्हणायचंय काय तुम्हाला?? "

" सरळच आहे ना प्रभू. नागेशने खून केलेला नाहीये, असे आम्हाला म्हणायचेय. " अल्फा म्हणाला. मला तर काही सुचायचेच बंद झाले.

" आपण लवकरात लवकर गुन्हेगार शोधायला हवा, गोष्टी हातातून निसटून जाण्याआधी. " प्रधान म्हणाले, "खुनी खुपच हुशार आहे. त्याने मोठ्या शिताफीने नागेशला जाळयात अडकविले आहे. त्यामुळे त्याने काही पुरावे मागे सोडले असण्याची शक्यता फारच धूसर वाटते. तरीही मला खात्री आहे, पठ्ठ्या कुठेतरी सापडेलच."

"यावेळी मी त्याला प्रथम शोधून काढेन. " अल्फा म्हणाला. प्रधान हसले.

" छे! तू तर नेहमीच असे म्हणतोस आणि शेवटी गुन्हेगारापर्यंत मीच पहिल्यांदा पोहोचतो. "

" यावेळी मुळीच नाही. तुम्ही पहाच. यावेळी मीच जिंकणार. " अल्फा निग्रहाने म्हणाला.

" लागली पैज? " प्रधानांनी हात पुढे केला. अल्फाने हात मिळवला, " लागली. "

" ठिक आहे. आपल्यातल्या कोणालाही खुनीचे नाव कळाले, तर त्याने लगेचच प्रभवला मेसेज करायचा. ज्याचा मेसेज पहिला जाईल, तो जिंकला. ठिक आहे ना प्रभव? " प्रधान म्हणाले, " आणि चीटींग करायची नाही. अल्फा तुझा मित्र असला तरीही तू अगदी निःपक्षपाती रहायला हवास. कोण जिंकला, याचा निर्णय तूच सांगशील. चालेल का? "

" बरं बरं. " अजुनही मी धक्क्यातून सावरलो नव्हतो.

" मी निघतो. " प्रधान सर उठले, " आता घाई करायलाच हवी. नंतर भेटू. "

ते निघून गेले. मी अजूनही अल्फाकडे 'आ' वासून पाहत होतो.

" तू विचार करत असशील, की हे सगळं नक्की चाललेय तरी काय. "तो हसत म्हणाला, " काही वेळापूर्वी आम्हीच नागेशला गुन्हेगार म्हणून पोलिसांच्या ताब्यात दिले आणि आता आम्हीच म्हणतोय की नागेश गुन्हेगार नाहीये. "

मी संदिग्धपणे नुसती मान डोलावली.

" सांगतो. " अल्फाने आजुबाजुला पाहिले, " पण इथे नको. इथे कुणालातरी ऐकू जाण्याची शक्यता आहे. आपण बाहेरच्या रोडवरून एक फेरी मारून येऊ. तिकडेच सांगतो तुला सगळं काही. "

आम्ही तेथून उठलो आणि बंगल्याच्या बाहेरील रस्त्यावर आलो. थोडे पुढे गेल्यावर अल्फाने कोणी ऐकत नाही, याची खात्री करुन घेतली आणि मग बोलण्यास सुरूवात केली,

" हां, आता सुरुवात करण्यास हरकत नाही. " तो म्हणाला, "कसं आहे ना प्रभू, आपल्या आजूबाजूला अनेक घटना घडत असतात आणि त्या अगदी सहजपणे, नैसर्गिकरीत्या घडत असतात. आपण त्या घटनांमागच्या कार्यकारणभावाबद्दल कधी विचारदेखील करत नाही. पण निसर्गाचीही घटना घडवून आणण्याची एक पद्धत आहे. कोणत्याही घटनेचे खोलवर जाऊन निरीक्षण केले, की ती पद्धत आपल्या लक्षात येते. याउलट मानवाने घडवून आणलेल्या घटनांमध्ये एक प्रकारचा कृत्रिमपणा असतो, जो थोड्या विचाराअंती लगेच लक्षात येतो. आता या खूनाचंच घे ना. खुनीने मिरासदारांचा खुन केला, ही एक घटना आहे. त्याची खून करण्याची पद्धत, खून झाला त्या ठिकाणची परिस्थिती आणि मागे राहिलेले पुरावे यांमध्ये जी नैसर्गिकता दिसायला हवी, ती मला मुळीच दिसली नाही. "

माझ्या चेहऱ्यावरील प्रश्नचिन्ह पाहून तो पुढे म्हणाला,

" थोडक्यात काय, तर आपण त्या खोलीत जे काही पाहिले, तो फक्त एक देखावा होता, खऱ्या गुन्हेगाराने उभा केलेला. खुनीने खून केलाय आणि अशी व्यवस्था करून ठेवली आहे, की तो नागेशनेच केलाय असे वाटावे. पण तरीही, खुनीचे दुर्दैव म्हण किंवा नागेशचे सुदैव म्हण, की यातील कृत्रिमपणा माझ्या नजरेतून सुटू शकला नाही. आता मी तुला ती गोष्ट सांगतो, जी मला विसंगत वाटली आणि त्यातूनच नागेशने खून केला नसल्याचा विचार माझ्या मनात उभा राहिला. ती गोष्ट म्हणजे त्या खोलीत सुटलेला परफ्यूमचा वास. तूच विचार कर, रात्री अडीच वाजता एखादा माणूस रूममधून बाहेर पडलाय आणि तेही फेरफटका मारायला नव्हे, तर खून करायला. मग तो इतका परफ्यूम मारून बाहेर पडेल का? साधेच लॉजिक आहे. इथेच संशयाला जागा निर्माण झाली. चल ठिक आहे, खुनी परफ्यूमसाठी वेडा आहे आणि त्याने काहीही विचार न करता परफ्यूम मारलाच असे समज. पण मी जेव्हा त्या चादरीला आणि मिरासदारांच्या कपड्यांना हात लावला, तेव्हा मला त्यावर थोडा ओलसरपणा जाणवला, ज्यावरून हे सिद्धच होते की परफ्यूम खुनीने मारला नसून तो थेट त्या चादरीवर आणि कपड्यांवर मारण्यात आला आहे. त्यामुळे अखेर, या गोष्टीवर शिक्कामोर्तब झाले, की ही केस दिसते तशी साधी नसून यात काहीतरी घोटाळा आहे. खुनी नागेश नसून दुसराच कोणीतरी आहे!! "

" खुपच ग्रेट!! " मी प्रभावित होऊन अल्फासमोर मान तुकविली, " अगदी अनपेक्षित होते हे. "

" मी जर हे नजरेतून निसटू दिले असते, तर मला अकलेचा कांदा म्हणणेच योग्य ठरले असते. " अल्फा म्हणाला. आम्ही मागे वळून पुन्हा बंगल्याच्या दिशेने चालू लागलो. मी माझ्या मनात घोळणारा सर्वात उत्सुकतेचा प्रश्न अल्फाला विचारला, " जर नागेश खुनी नाहीये, तर मग कोणी केला असेल हा खून? तुला काय वाटतंय? "

अल्फा पुन्हा विचारात बुडाला.

" मला सध्या तरी या गोष्टीचा काहीच अंदाज येत नाहीये. " तो म्हणाला, " त्या खोलीत आणखीही अशा काही गोष्टी होत्या, ज्यांचा उलगडा मला होत नाहीये. पहिली गोष्ट, जी नागेशने आपल्या बचावासाठी वापरली, पण त्यात त्याला यश आले नाही - ती म्हणजे मेसेजसाठी वापरण्यात आलेला फोन. वरून दिसायला अगदीच निरर्थक वाटत असला तरीही तो मुद्दा विचार करण्यासारखा आहे. जो नंबर मिरासदार त्यांच्या अगदी जवळच्या व्यक्तींसाठी वापरत होते तो नंबर ते इतक्या रात्री मेसेज करण्यासाठी वापरतीलच का? आणि तेही अशा माणसाला, जो सदासर्वकाळ तुम्हाला त्रास देण्याशिवाय दुसरे काहीही करत नाही!! मी जर त्यांच्याजागी असतो, तर तो नंबर नागेशला कधीही कळणार नाही, याची मी पुरेपूर खबरदारी घेतली असती. आता तू नसत्या शंका काढू नकोस, पहिल्या नंबरवर बॅलन्स नसेल वगैरे. मी सगळे तपासून बसलो आहे. त्यांनी दुसऱ्या नंबरवरून मेसेज करावा याचे कोणतेच कारण सापडत नाही.

आणि दुसरी गोष्ट म्हणजे ती चादर, जी खुनीने मिरासदारांचा गळा आवळण्यासाठी वापरली. तू पाहिले असशील, त्या खोलीत दरवाज्याच्या जवळच भिंतीवरील खुंटीला एक जाडजूड दोर अडकवला होता. त्याने गळा आवळणे खुनीला फारच सोपे गेले असते. पण त्याने तो न वापरता दरवाजापासून लांब, खिडकीजवळ असलेल्या बेडवरील चादरीचा वापर यासाठी केला. यामागील कारण काय असावे, याचा अंदाज येत नाही. एकूणच, त्या खोलीत काही अशा गोष्टी आहेत, ज्यांचे स्पष्टीकरण करता येत नाही. याचाच अर्थ हा खून सहजपणे घडला नसून त्याच्या दृश्य चेहऱ्यामागे बऱ्याच गोष्टी दडलेल्या आहेत. आणि त्याच आपल्याला शोधून काढायच्या आहेत. "

आम्ही पुन्हा 'देखावा' बंगल्यापाशी आलो.

" मग आता तू काय करणार आहेस? " मी विचारले.

" आता मेंदूचा किस पाडण्याशिवाय पर्याय नाही. " अल्फा एक मोठा सुस्कारा सोडत म्हणाला, " मला काहीही करून हे कोडे प्रधान सरांच्या आधी सोडवायचेय. त्यासाठी या

प्रकरणाच्या सर्व बाजूंचा शांतपणे विचार करणे आवश्यक आहे आणि त्यासाठी तू माझ्यापासून लांब जाणे आवश्यक आहे. "

" हे काय आता नवीनच? " मी जरा फटकाऱ्यानेच म्हणालो, " मी जवळ असल्यावर तुझी बुद्धी काम द्यायचे बंद करायला लागली की काय?? "

" तसं नाही रे. " अल्फा म्हणाला, " पण माझ्या आणि प्रधान सरांच्या शर्यतीत तू मध्यस्थी आहेस ना. त्यामुळे तू जवळ असलास की माझ्यावर दबाव येत राहिल. तुला प्रधान सरांचा कोणत्याही क्षणी मेसेज येईल आणि आपण हरू, असे मला वाटत राहिल आणि माझे या प्रकरणाकडे लक्षच लागणार नाही. त्यामुळे तू आता चालता हो. अगदी मला गरज पडलीच, तर तुला बोलावून घेईन. "

" वा रे वा!! तुला मदत लागेल, तेव्हाही मी 'मध्यस्थी'च असणार ना? मग तेव्हा नाही का येणार तुझ्यावर दबाव? नुसता कामापुरता मामा नाही चालणार हां!! "

" अरे देवा!! " अल्फा वैतागून म्हणाला, " बरं ते मदत लागल्यानंतर पाहू. आत्ता तू आत जा बरं. मी अजून पुढे जाणार आहे फिरायला. "

" हो, जातो जातो. " अल्फाने हाकलल्यानंतर मला आत जाण्यावाचून पर्यायच उरला नाही. नऊ वाजायला आले होते. मला वेळ कसा घालवावा, हेच समजेना. ते फार्महाऊस शहरापासून दूर असल्यामुळे नेटवर्क खूपच कमी होते. त्यामुळे इंटरनेट वापरण्याची सोयच नव्हती. माझ्या मोबाईलमध्ये गेमही नव्हते. त्या ठिकाणी माझ्या ओळखीचे असेही कोणी नव्हते. आपण येताना एखादे अभ्यासाचे पुस्तक आणायला हवे होते, मी विचार केला. इतका प्रचंड बोअर मी कधीच झालो नव्हतो. एका बाजूला अल्फा काय करत असेल, प्रधान सर काय करत असतील, मिरासदारांचा खुन कोणी केला असेल या गोष्टींबद्दलची उत्सुकता मला स्वस्थ बसू देत नव्हती आणि दुसऱ्या बाजूला मी काही करूदेखील शकत नव्हतो.

विचार करून करून माझे डोके दुखायला लागले. अल्फाचा शोध कधी एकदा संपतोय, असे मला झाले होते. थोडा वेळ मी गार्डनमध्येच बसून घालविला. फार्महाऊसवर मिरासदारांचे पाहुणे येत -जात होते. माझी एकतर कोणाशी ओळख नव्हती आणि त्यातच हा असा प्रसंग. त्यामुळे मी आत न जाता बाहेरच्या बाहेरच वेळ काढला. एक-दिडच्या सुमारास गणपतने जेवायला बोलावले. जेवणाच्या वेळी सतत मी अल्फा किंवा प्रधान सर यांपैकी कोणी दिसतायत का, हे पाहत होतो. पण दोघेही गायब होते. मी मोबाईलही वारंवार पाहात होतो. पण अजूनतरी दोघांपैकी कोणाचाही मेसेज मला आला नव्हता. अखेर कंटाळून मी माझ्या खोलीत गेलो. रात्रीच्या अपुऱ्या झोपेमुळे डोळयांवर झापड येत होती. मी विचार करता करताच बेडवर पडलो आणि मला कधी झोप लागली, हे कळालेच नाही.

अखेर दुपारी कधीतरी माझा मोबाईल वाजला आणि मला एकदम दचकून जाग आली. तो कोणाचातरी मेसेज होता. मी ताबडतोब मोबाईल चेक केला. तो अल्फाचा मेसेज होता -

'पटकन वरती मिरासदारांच्या खोलीत ये. तुझी मदत लागण्याची शक्यता आहे. '

मी वेळ पाहिली. संध्याकाळचे चक्क पाच वाजायला आले होते!! मी इतका वेळ कसा झोपलो, याचे मलाच आश्चर्य वाटले. मी तसाच उठलो आणि लगबगीने वरती मिरासदारांच्या खोलीत गेलो. तिथे अल्फा खोलीची तपासणी करीत होता. मी येताच त्याने मला दरवाजा बंद करण्यास सांगितले.

"प्रभू, तुझ्या स्मरणशक्तीला आता भरपूर ताण दे आणि मला सांग, की काल रात्री खुन झाल्यानंतर आपण जेव्हा वरती आलो तेव्हा ही खिडकी उघडी होती का? "

मी काल रात्रीचा प्रसंग डोळयांसमोर उभा केला आणि मला स्पष्ट आठवले.

" हो, खिडकी उघडीच होती. "

" नक्की? " त्याने पुन्हा विचारले.

" शंभर टक्के. " मी ठामपणे म्हणालो.

" अगदी पूर्णच्या पूर्ण उघडी होती? " त्याने विचारले.

" हो. खिडकी संपूर्ण उघडलेली होती. " मला उघडी असलेली खिडकी चांगली आठवत होती.

" गुड गुड. " अल्फा म्हणाला. तो स्वतःशीच जाम खुष झालेला दिसत होता.

"तुला काही मिळालंय का? " मी अधीरतेने विचारले.

" एक मिनीटभर काही बोलू नकोस. " अल्फा माझ्याकडे न पाहताच म्हणाला. त्याचा तपास सुरूच होता. मला जरा रागच आला. आपण काय करतोय, याचा दुसऱ्याला थांगपत्ताही लागू न देण्याची अल्फाची वाईट सवय होती. त्याच्या दृष्टीने ती एक कला होती खरी, पण मला काहीच उमजत नसल्याने मला राग यायचा. अल्फा काही वेळ त्या खोलीत इकडे तिकडे फिरत होता आणि मी त्याच्याकडे टकामका पाहत उभारलो होतो. तो प्रथम जमिनीवरून रांगत दारापासून खिडकीपर्यंत गेला. मग उभा राहिला. पुन्हा बसला. मग त्याने मिरासदारांचा मोबाईल भिंतीमधील ज्या कप्प्यात ठेवला होता, त्याची उंची मोजली. दरवाजाला लागून ज्या खुंटीवर जाड दोर अडकवला होता, त्याचीही उंची मोजली. असे करताना तो सारखे खिडकीतून बाहेर पाहत होता. त्याचे हे माकडचाळे नक्की कशासाठी चालले आहेत, याचा मला काही अंदाज येईना. अखेर तो व्यवस्थित उभा रहात मला म्हणाला,

"आता एक काम कर प्रभू. खाली समोर जो रस्ता दिसतोय ना, गार्डनच्या पलीकडे, तिथे जा आणि तिथून मला 'हाय' कर. " त्याने खिडकीतून बाहेर बोट दाखविले.

" काय? " मी चक्रावलोच, " तू नक्की तपासच करतोयस ना??"

"होय रे. मला ठाऊकाय, तू मनातल्या मनात मला वेडपट म्हणत असशील. पण आधी मी सांगतोय तसे कर. "

" बरं. " मी डोके खाजवत खाली आलो. रस्त्यावरून वरच्या मजल्यावरील खिडकीत उभ्या अल्फाकडे पाहात मी जोरात हात हलवला. अल्फानेही हात हलवला आणि तिथून मला फोन केला,

" प्रभू, जरासा मागे जा. " फोन कानाला लावूनच हातवारे करीत अल्फा म्हणाला, " त्या दिव्याच्या खांबापाशी जा. हां, शाबास. आता तुला तेथून या खोलीतले काय काय दिसते, ते सांग. "

मी त्याने सांगितले तसे केले. मला हा प्रकार जरा मजेशीरच वाटत होता.

" मला तूच दिसतोयस. " मी म्हणालो.

" ओह सॉरी.. " तो बाजूला झाला, " आता सांग. "

ती खिडकी बरीच मोठी असल्यामुळे मला मी उभा होतो तिथून मिरासदारांची जवळपास सर्वच्या सर्व खोली दिसत होती.

" मला खोलीतील सगळंकाही दिसतंय. " मी म्हणालो.

" दरवाजा दिसतोय??" अल्फाने प्रश्न केला. दरवाजा तर खिडकीच्या अगदी समोरच होता.

"हो, दिसतोय. " मी उत्तरलो.

"बाजुच्या भिंतीवरील खुंटीला लटकविलेला दोर दिसतोय?"

"हो, दिसतोय. "

" मिरासदारांचा मोबाईल जिथे ठेवला होता, तो कप्पाही दिसतोय? "

" हो. तोही अगदी व्यवस्थित दिसतोय. " मी म्हणालो. आता अल्फा दरवाजापाशी येऊन उभा राहिला.

" आता मी दिसतोय का? "

" हो, दिसतोयस. " मी पुन्हा शहाण्या मुलासारखा उत्तरलो. मग अल्फा खाली वाकला आणि दिसेनासा झाला.

" आता दिसतोय? " त्याने विचारले.

" नाही. " मी म्हणालो, " खिडकीखालची भिंत मध्ये येतेय. "

" वा वा!! फारच उत्तम. "त्याचा आवाज खूपच आनंदी वाटला, " थांब तेथेच. मी आलो खाली. "

मिनीटभरातच तो मी उभा होतो, तेथे आला. येताच त्याने त्या जागेची तपासणी करण्यास सुरुवात केली. हे जे काही चाललं होतं, ते सगळंच्या सगळं माझ्या डोक्यावरून चाललं होतं. मला अल्फाच्या कृती नुसत्या पाहत राहण्याखेरीज काही पर्यायच नव्हता. मिरासदारांची खोली सोडून हा पठ्ठ्या इकडे का आला आहे, हेच मला समजेना. मी अल्फाच्या चेहऱ्याकडे पाहिले. त्याचा चेहरा उत्साहाने भरून गेला होता आणि डोळे चमचमत होते.

" अरे बुद्धिमान प्राण्या, एका शब्दाने तरी बोलशील का, की हे सगळे चाललेय काय?? " मी त्याला सवाल केला, "काहीतरी महत्त्वाचे हाती लागलेले दिसतेय. हो ना?"

"खुपच महत्त्वाचे. " तो आता उत्साहाने जवळपास उड्याच मारत होता, " ही केस इतकी भन्नाट असेल, अशी मी कल्पनाही केली नव्हती. खुपच अनपेक्षित. खुपच अतर्क्य.. अतिशय विलक्षण!! "

" खुनी कोण आहे, हे कळाले? " मी उतावीळपणे विचारले.

" नाही. पण लवकरच कळेल. " अल्फा म्हणाला.

" मला आधी सांग, आपण या ठिकाणी रस्त्यावर उभे राहून करतोय तरी काय? आणि मघाची ती 'तुला काय काय दिसतेय' ची भानगड नक्की काय होती? "

" सांगेन, सांगेन. लवकरच सांगेन. तूर्त तरी मी तुला एवढेच सांगू शकतो की, " अल्फा आवाज खाली करत म्हणाला, " काल रात्री खुन झाला तेव्हा या ठिकाणी रस्त्यावर एक व्यक्ती उभी होती आणि खोलीत चालू असलेल्या सर्व घटना ती पाहत होती..!!! "



***

# 5.

" क्काय?? " मी जवळपास उडालोच.

" श् श् श.. " अल्फा इकडेतिकडे पाहत म्हणाला, " ओरडू नकोस. कोणी ऐकले, तर इतका वेळ मी सर्वांच्या नकळत केलेल्या तपासाचा बट्ट्याबोळ होईल. "

" पण.. पण.. हे.. कसे काय.. "माझ्या तोंडातून शब्दच फुटत नव्हते.

" तुला सांगत बसलो तर प्रधान सर माझ्याआधी बाजी मारतील. आत्ता नाही!! "

" नाऽऽही!! " मी हट्टीपणे ओरडलो, " तू मला नेहमीच असे लटकवून ठेवतोस. आज मी तुला याचे स्पष्टीकरण दिल्याखेरीज जाऊच देणार नाही. "

" प्रभू, प्लीज रे. अगदी काही वेळाचेच काम शिल्लक आहे. आणखी थोडा धीर धरलास तर काही बिघडत नाही. माझ्या प्रतिष्ठेचा प्रश्न आहे यार.. " अल्फा विनवणी करीत म्हणाला.

" हं.. प्रतिष्ठा बितिष्ठा काही नाही. आता मी तुला मुळीच सोडणार नाहीये!! " मी म्हणालो, " मला सांग, तुला कसं काय कळालं की काल रात्री इथे कोणीतरी होतं आणि हेही सांग की ते कोण होतं. "

"बरं. महाराज. सांगतो. तू काही सगळं सांगितल्याशिवाय शांत बसणार नाहीस." अल्फा अखेर कबूल झाला, " पण मी तुझ्या पहिल्या प्रश्नाचे उत्तर आत्ता अजिबात देणार नाही. ते सांगायला सुरुवात केली, तर रात्र होईल. पण तुझ्या दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर मी नक्की देईन. चल माझ्यासोबत."

"आत्ता? कुठे?? "मी चक्रावून विचारले.

" तू जास्त प्रश्न विचारलेस तर मी काहीही सांगणार नाही हां! " अल्फाने मला तंबी दिली. मी चुपचाप मान डोलावली. आम्ही बंगल्याच्या समोरच्या वाटेवरून पुढे निघालो.

" तर, " अल्फाने सुरूवात केली, " आपण थेट या मुद्द्यावर येऊया, की काल रात्री खुन होण्याच्या सुमारास इथे खाली रस्त्यावर कोणीतरी उभे होते. हे मला माहीत झाले, यामागे बरीच मोठी तर्कश्रृंखला आहे. या अनुमानांवर येण्यासाठी मी चांगले पाच-सहा तास खर्ची घातले आहेत. तूर्तास तरी आपल्याला ही गोष्ट ठाऊक आहे, असे धरून चालूया. मी खाली येऊन दिव्याखालच्या जागेची थोडी तपासणी करताच मला माझ्या तपासाची दिशा अगदी योग्य असल्याची पावती मिळाली. तिथे मला एका तुटलेल्या चपलेचे ठसे मिळाले. एका तेरा-चौदा वर्षांच्या मुलाच्या चपलेचे ठसे. ओळख पाहू, ती व्यक्ती कोण असेल? "

" संजू? तो बागकाम करणारा पोरगा?? " मी काही क्षण विचार करून उत्तर दिले. त्या फार्महाऊसवर मला आत्तापर्यंत दिसलेली तेरा-चौदा वर्षांची संजू ही एकमेव व्यक्ती होती.

" अगदी बरोबर! "

" पण अल्फा.. संजूसारखा लहान पोरगा इतक्या रात्री भुतासारखा रस्त्यावर कशाला उभा राहिल? " मी डोके खाजवत विचारले.

" कारण त्याला तसे करण्यास खुद्द मिरासदारांनीच सांगितले होते. " अल्फा म्हणाला.

" काय?? " मला धक्काच बसला.

" होय. " अल्फा म्हणाला, " मला जेव्हा शंका आली, की रात्री खुनाच्या वेळी रस्त्यावर कोणीतरी असावे, तेव्हा मी या गोष्टीची अधिक खोलवर जाऊन चौकशी करण्यास सुरुवात केली. तेव्हा मला समजले, की मिरासदारांना जेव्हा आपल्याला धोका आहे असे वाटायचे, तेव्हा ते असेच कोणालातरी पाळतीवर ठेवायचे. त्यांच्यासाठी हे काम गणपत व

संजू दोघांनीही याआधी बऱ्याचदा केले होते. काल रात्रीही तशीच परिस्थिती निर्माण झाली होती. नागेशबरोबर झालेल्या भांडणामुळे आपले काही बरेवाईट होईल, अशी भीती मिरासदारांच्या मनात उत्पन्न झाली आणि त्यांनी कालच्या रात्रीसाठी संजूला खाली रस्त्यावर उभे राहून पाळत ठेवायला सांगितली, जेणेकरून कोणीही त्यांच्यावर हल्ला केलाच, तरी त्याचा चेहरा संजूला दिसावा. अखेर माझी शंका खरी ठरली. संजू काल तिथे होता, याचा पुरावा आपल्याला मिळालाच. "

" माय गॉड!! " मी प्रतिक्रिया व्यक्त केली, " म्हणजे संजूने काल रात्री खुनीला पाहिले आहे की काय?? "

" त्याची शक्यता खुपच कमी आहे. " अल्फा उद्गारला, " खुनी खुपच हुशार आहे, प्रभू. त्याने खुन करताना पुरेपूर काळजी घेतली आहे. मला तर वाटतंय, संजू खाली उभारलेला आहे, हे खुनीला आधीपासूनच ठाऊक होते..!!"

"देवा! अल्फा!! तू हे तर्क कसे करतोस खरंच मला समजत नाही बाबा!! कशावरून बोलतोयस तू हे?? "

" माझे उत्तर पुन्हा तेच आहे - हे मी आत्ता सांगणार नाही. थोडी वाट पहा. " अल्फा म्हणाला, " आपण आता संजूला लवकरात लवकर भेटणे महत्वाचे आहे. त्याच्याकडून माहिती काढून घेणे हे एक दिव्यच आहे खरे. पण आपण प्रयत्न करू. त्याच्या घरीच आपण निघालोय. हे पहा, आलेच त्याचे घर. "

आम्ही एका छोट्याशा झोपडीवजा घरापाशी येऊन पोहोचलो. हेच संजूचे घर होते. अल्फाने बाहेरूनच संजूला हाक दिली. तो बाहेर आला. आम्हाला पाहून तो थोडासा गोंधळल्यासारखा दिसला.

" हॅलो!! कसा आहेस संजू? " अल्फाने विचारले. त्याने थोड्या संभ्रमाने नुसती मान डोलावली.

" चल आमच्यासोबत. थोडंसं फिरून येऊया. " अल्फा म्हणाला. ते ऐकून संजू आणखीच बुचकळयात पडला. दोन अनोळखी लोकांनी अचानकच येऊन फिरायला चल म्हटलं, तर कोणीही गोंधळात पडेल. थोडं मागेपुढे करत तो तयार झाला आणि आमच्याबरोबर यायला निघाला. आम्ही तिघेही तसेच रस्त्यावरून पुढे चालत गेलो.

" काल जे झालं ते फारच वाईट झालं. " अल्फा म्हणाला, " मिरासदारसाहेब तुम्हा सगळ्यांनाच फार जवळ होते. त्यांच्यासोबत असं काही होईल, असं वाटलं नव्हतं. अतिशय निर्घृणपणे खुन झाला आहे त्यांचा. "

संजूने नुसती मान डोलावली.

"मला तुझ्या मालकांच्या खुनाबद्दलच बोलायचं आहे तुझ्याशी. अगदी खाजगी. मी जे काही सांगतो, ते अगदी शांतपणे ऐक आणि घाबरू नकोस. मी काही तुला खाणार नाहीये."

हे ऐकून तो आणखीनच बावरला. त्याने पुन्हा एकदा मान डोलावली.

" मिरासदार साहेबांच्या खुनाबद्दल काही धक्कादायक गोष्टी माझ्या हाती लागल्या आहेत, ज्या कोणालाच ठाऊक नाहीयेत. " अल्फा म्हणाला, " त्यांचा खुन नागेशने केलेला नाहीये. "

ते ऐकून संजूचे डोळे विस्फारले गेले.

" होय. " अल्फा म्हणाला, " हे आपण तिघे आणि प्रधान सर सोडून कोणालाच ठाऊक नाहीये. मिरासदार साहेबांच्या खऱ्या खुनीला आपल्याला पकडायला हवे आहे. आणि ते करण्यासाठी मला तुझी मदत हवी आहे. मी आता तुला काही प्रश्न विचारणार आहे. तू फक्त 'हो' किंवा 'नाही' एवढेच बोल. आणि जे खरे असेल तेच बोल. तू मला जितका जास्त प्रतिसाद देशील, तितक्या लवकर आपण खुनीपर्यंत पोहोचू शकू. ठिकाय? "

संजूने भीत भीतच होकारार्थी मान डोलावली.

" तर मला सांग, काल रात्री दोन वाजता तू बंगल्याच्या समोरच्या रस्त्यावर उभा होतास, बरोबर? "

संजूचा चेहरा भीतीने भरून गेला. त्याने काहीच उत्तर दिले नाही.

" हे बघ. जर तू काहीच बोलला नाहीस, तर आपण खुनीपर्यंत कधीच पोहोचू शकणार नाही. मिरासदारांनी तुझी एवढी मदत केलीये. तू त्यांच्यासाठी एवढं तर करू शकतोसच ना!! " अल्फा त्याची समजूत घालत म्हणाला, "मला आता पटकन सांग पाहू, काल रात्री तू तिथे होतास की नव्हतास?"

त्याने होकारार्थी मान डोलावली.

"शाबास. "अल्फा खुष होऊन म्हणाला, " तुला मिरासदारांनीच तसे करायला सांगितले होते, बरोबर? "

पुन्हा 'हो'.

" त्यांनी सांगितल्यानुसार तू त्यांच्या खोलीच्या बरोबर समोर दिव्याखाली उभा राहिलास. तू तिथे बराच वेळ उभा होतास. अखेर रात्री दोनच्या सुमारास मिरासदारांच्या खोलीचे दार उघडले गेले. "

संजूने 'हो' करत अल्फाशी सहमती दर्शविली.

" तुला दरवाजाच्या बाहेर कोण होते, हे खालून दिसले का? "

संजूची प्रतिक्रिया - 'नाही '

" मला वाटलंच होतं. "अल्फा स्वतःशीच बोलला, " बरं, मग पुढे दार उघडल्यानंतर मिरासदार खाली वाकले आणि दिसेनासे झाले. "

संजू - 'हो'.

"त्यानंतर तू तिथे फार वेळ थांबला नाहीस, हे मी खात्रीशीरपणे सांगू शकतो. "अल्फा म्हणाला, "थोड्या वेळाने मिरासदारांनीच तुला तेथून जाण्यास सांगितले, हो ना??"

संजूने पुन्हा होकारार्थी मान डोलावली.

" हे अगदी तसेच आहे, जशी मी कल्पना केली होती!! " अल्फा म्हणाला. तो खुपच रोमांचित झालेला दिसत होता, " आता मला सांग संजू, की मिरासदारांनी तुला तेथून जाण्यास नक्की कसे सांगितले? म्हणजे, एखादा इशारा अथवा आणखी काही?? "

संजूने हातानेच खिडकी दाखविली आणि 'जा' असे हातवारे केले.

" त्यांनी खिडकीत उभे राहून 'जा' अशी खूण केली? "

तो मानेने 'हो' म्हणाला.

" तू त्यांना पाहिलेस? म्हणजे, मला असे म्हणायचेय, की तुला जाण्यास सांगणारे मिरासदारच होते अशी तुझी खात्री आहे का? " अल्फाचा उत्साह दर प्रश्नागणिक वाढत चालला होता. त्या प्रश्नाला उत्तर म्हणून संजूने काही हातवारे केले, ज्याचा अर्थ आम्ही असा लावला -

'साहेबांना मी खिडकीत पाहिले नाही. पण त्यांचा हात पाहिला. त्यांनी नुसता हात बाहेर काढून मला जाण्यास सांगितले. त्यामुळे मी निघून आलो. '

"तुझी खात्री आहे, की तो हात मिरासदार साहेबांचाच होता? " अल्फाने पुन्हा प्रश्न केला.

संजूने गोंधळून मान डोलावली.

" असं तुला का वाटतं? तो हात साहेबांचाच आहे, हे तू कशावरून सांगू शकतोस??"

संजूने शर्टाकडे बोट दाखविले आणि मनगटावरचे घड्याळदेखील दाखविले.

" त्या हातावरचा शर्ट आणि घड्याळ मिरासदारांचेच होते? नक्की?? "

संजूने पुन्हा एकदा जोराने मान डोलावली. ते ऐकताच अल्फाच्या चेहऱ्यावर विजयी भाव उमटले. क्षणात त्याचा नूर पालटून गेला.

" खुपच छान!! उत्तम!! " तो आनंदाने म्हणाला, " अखेर मासा गळाला लागलाच. संजू.. तुला ठाऊक नाहीये तू किती मोठं काम केलयंस ते!! माझे आधीपासून खुनी कोण असावा, याबाबत काही अनुमान होतेच. तुझ्यामुळे आता मी पुराव्यासह ते सिद्ध करू शकतो. खुप खुप धन्यवाद. "

अल्फाने संजूच्या पाठीवर थाप मारली. मी आणि संजू दोघेही काहीच न कळून अल्फाकडे पाहत होतो. त्याने आपल्या पाकिटातून काही पैसे काढले आणि ते संजूच्या हातांवर ठेवले.

" हे घे. यातून नवे चप्पल घे. " अल्फा म्हणाला, " शाळेला जातोस ना? "

संजूने मघासारखीच 'हो' अशी मान डोलावली. ते पैसे घेताना त्याला भरून आले होते.

" गुड. " अल्फा म्हणाला, " आपल्याला आयुष्यभर इथे रहायचे नाहीये, हे लक्षात ठेव. शिकून मोठा हो. तुला जाण्याआधी मी माझा फोन नंबर देईन. काही लागले, तर मला फोन करायचा. समजलं? जा आता."

मी त्या प्रसंगी जास्त भावूक झालोय की जास्त उत्साही झालोय, हे मलाच ठरवता येईना. संजूने गहिवरून जाऊन हात जोडले. अल्फाने हसून त्याची पाठ थोपटली. तो निघून गेला. अल्फाने माझ्याकडे पाहिले.

" अखेर तुला कळाले, खुनी कोण आहे ते!!"मी म्हणालो, "कोण आहे तो?"

"थांब जरा. एक महत्त्वाचे काम करतो आधी. "अल्फाने त्याचा मोबाईल काढला, " मी तुझ्या मोबाईलवर मेसेज टाकून घेतो. मी केस सोडविली, त्या वेळेचा पुरावा. प्रधान सरांचा अजून मेसेज आलेला दिसत नाहीये. त्यामुळे या वेळी मी पैज जिंकणार, हे नक्की."

त्याने मेसेज केला. मी हळूच माझा मेसेज बॉक्स उघडला आणि माझ्या भुवया उंचावल्या गेल्या. खुनीचे नाव समोर होते.

"अनबिलीव्हेबल!! हे कसे शक्य आहे?? " मला तर धक्काच बसला.

" शक्य तर आहेच, आणि सत्यही आहे. " अल्फा म्हणाला, " आता तू एक काम कर. बंगल्यावर जा आणि गणपतला खुन झाल्याच्या रात्री जे बंगल्यावर होते, त्यांना इथे बोलावून घ्यायला सांग. का विचारले, तर म्हणावं प्रधान सरांना मिरासदारांच्या खुनाबद्दल सर्वांशी काही महत्त्वाचे बोलायचे आहे. मी प्रधान सरांना शोधून घेऊन येतो. "

मी नुसती मान डोलावली. माझा मेंदू आता एकामागोमाग एक धक्के खाऊन सुंद पडला होता. अल्फा निघून गेला. मी बंगल्यात आलो आणि गणपतला शोधून परिस्थितीची कल्पना दिली. फोनाफोनी झाली आणि हळूहळू सर्वजण बंगल्यावर जमा होऊ लागले. अंधार पडू लागला आणि सर्वत्र दिवे लागले. मी सर्वांना हॉलमध्ये बसून वाट पाहण्यास सांगितले. थोड्याच वेळात अल्फा आणि प्रधान सर आले.

हॉलमध्ये सर्वजण आधीच येऊन बसले होते. महेश, विवेक, सचिन ही मिरासदारांची मुले, घरगडी गणपत, त्याच्या हाताखाली काम करणारा पोरगा संजू आणि आणि काल रात्री फार्महाऊसवर उपस्थित असलेले काही मोजके लोक तेथे उपस्थित होते. अल्फा आणि प्रधान सर येण्याआधी तेथे हलकी कुजबुज सुरू होती. प्रत्येक चेहरा गोंधळलेला आणि थोडासा भेदरलेला होता. ते दोघे येताच सर्वजण शांत झाले. आम्ही समोरील रिकाम्या सोफ्यावर जाऊन बसलो.

"आम्हाला इथे इतक्या तातडीने का बोलावले, श्री प्रधान? तुम्ही आम्हाला काय सांगणार आहात? " महेशने विचारले.

" आम्हाला माधव मिरासदारांच्या खुनाबद्दल बोलायचे आहे. " प्रधान म्हणाले, " किंबहुना, ज्याने खुन केला, त्याच्याबद्दल. "

" पण नागेशला तर पोलीस घेऊन गेले आहेत. " विवेक म्हणाला, " तुम्हीच त्याला गुन्हेगार घोषित केले, होय ना? सगळे तर स्पष्ट झालेय. आणखी काही बाकी आहे का? "

" होय. आणखी बरेच काही बाकी आहे. " प्रधान सर डोळे बारीक करीत म्हणाले. त्यांनी अल्फाला खूण केली. अल्फाने एक मोठा श्वास घेतला आणि बोलण्यास सुरूवात केली...

***

# 6.

"नमस्कार मंडळी." अल्फा म्हणाला, "मी इथल्या कोणालाच माहीत असण्याचे कारण नाही. मी माधव मिरासदारांना याआधी कधी भेटलोही नव्हतो आणि आमची ओळखही नव्हती. त्यामुळे तुम्ही मला ओळखण्याचा प्रश्नच येत नाही. म्हणून प्रथम मी माझी ओळख करून देतो. मी अल्फा. प्रधान सरांचा सहकारी. काल प्रधान सरांनी आग्रह केला म्हणून मी आणि माझा मित्र प्रभव या कार्यक्रमाला हजर झालो. दुर्दैवाने तो मिरासदारांचा शेवटचाच दिवस ठरला. असे काही होईल, हे कोणाच्याच ध्यानीमनी नसावे. अर्थात, अपवाद आहे तो मिरासदारांच्या खुनीचा. नागेश पूर्वीपासूनच मिरासदारांना त्रास देत होता. अलिकडे त्याने प्रॉपर्टीमधला हिस्सादेखील मागण्यास सुरूवात केली होती, असे काल त्यानेच कबूल केले. काल रात्री बाराच्या सुमारास त्याची आणि मिरासदारांची वादावादीदेखील झाली होती. आणि काही वेळाने, रात्री अडीचच्या आसपास कधीतरी मिरासदारांचा खुन झाला.

दर्शनी पुरावे आणि खुनाच्या ठिकाणची परिस्थिती खुनी म्हणून नागेशकडेच बोट दाखवित होती. त्याच्यापाशी खुन करण्यासाठी पूरक असे कारण होते. त्याची गुन्हेगारी पार्श्वभूमीही त्याच्या विरोधात होती. याखेरीज खुनाच्या आधी मिरासदारांनी नागेशला पाठविलेला तो मेसेज, मिरासदारांच्या मृतदेहाजवळ सर्वात आधी त्याचे आढळणे आणि त्यांच्या कपड्यांना आणि त्यांचा ज्या चादरीने गळा आवळून खुन झाला, तिला त्या विशिष्ट परफ्यूमचा वास असणे.. या गोष्टी निर्विवाद सिद्ध करत होत्या, की मिरासदारांचा खुन नागेशनेच केला आहे. पण डोळ्यांना दिसणारे दृश्यही कधीकधी धोका देऊ शकतेच ना. या प्रकरणाचा आपण जर थोडासा खोल जाऊन विचार केला, तर या गोष्टींमधला फोलपणा आपल्या लक्षात येतो आणि खुनी नागेश नसून कोणीतरी दुसराच आहे, अशा निष्कर्षाकडे आपण जायला लागतो. "

" काय?? " तिथे बसलेल्या प्रत्येकाला अल्फाच्या त्या वाक्याने जोराचा झटका दिला. सर्वत्र कुजबुज सुरू झाली आणि क्षणात वातावरण भीतीने भरून गेले.

" काय म्हणायचेय काय तुम्हाला?? " सचिन मिरासदार ओरडला.

" स्पष्टच आहे, नाही का? मला हेच सांगायचेय, की आपण चुकीच्या माणसाला पकडले आहे. " अल्फा आपला धारदार कटाक्ष सर्वांवर टाकत म्हणाला, " माधव मिरासदारांचा खुन नागेशने केलेलाच नाहीये. "

" पण.. पण.. कशावरून..??? " विवेकाने स्वतःला सावरत विचारले.

" सांगतो. आपण पहिल्यापासून एक एक गोष्ट पाहत जाऊया, जेणेकरून तुमच्या शंकेला जागाच रहायला नको." अल्फा उद्गारला, "आपल्याला हे ठाऊक आहे, की नागेश बऱ्याच दिवसांपासून माधव मिरासदारांना प्रॉपर्टीसाठी छळत होता. काल रात्री अकराच्या सुमारास विवेकनी त्या दोघांना मिरासदारांच्या खोलीत भांडताना ऐकले होते. तेव्हा नागेश मिरासदारांकडे प्रॉपर्टीमधला हिस्सा मागत होता आणि ते तो देण्यास आढेवेढे घेत होते. त्यानंतर काही तासांतच मिरासदारांचा खुन झाला. या दोन्ही गोष्टी एकमेकांशी जोडल्या, तर असाच निष्कर्ष निघतो, की मिरासदारांचा खुन नागेशनेच केला आहे. अर्थात, ते साहजिकच आहे. विवेकच्या जागी दुसरे कोणीही असते, तर त्याने हाच निष्कर्ष काढला असता.

पण खुनाच्या ठिकाणची परिस्थिती काही वेगळेच सांगत होती. त्या खोलीत अशा काही गोष्टी होत्या, ज्यांचा नीट विचार करता खुन नागेशने केला नसावा, असे निष्पन्न होत होते. त्यांतली पहिली गोष्ट म्हणजे त्या खोलीत दरवळणारा परफ्यूमचा घमघमाट. रात्री दोन वाजता खुन करण्यासाठी बाहेर पडलेला कोणीही अंगावर परफ्यूम मारून बाहेर पडणार नाही. इथेच संशयाला जागा निर्माण झाली. त्यातच, मिरासदारांच्या कपड्यांच्या आणि त्या चादरीच्या ओलसरपणामुळे हे स्पष्टच झाले, की परफ्यूम थेट त्यावरच मारण्यात आला आहे. नंतर मी थोडा तपास केला, तेव्हा मला आढळून आले, की हे करण्यासाठी

हॉलमधील काचेच्या कपाटातील परफ्यूमची बाटली वापरण्यात आली आहे. तेव्हा मला प्रथम वाटले, की नागेश खुनी नसून त्याला मुद्दाम अडविण्यात आले असावे.

मग मी या शक्यतेला पुष्टी देणाऱ्या आणखी काही गोष्टी दिसतात का, हे पाहण्यास सुरूवात केली आणि मला त्या मिळतही गेल्या. दुसरी गोष्ट होती, ती म्हणजे मिरासदारांनी नागेशला मेसेज करण्यासाठी वापरलेला मोबाईल. त्यांनी त्यांचा नेहमीचा फोन न वापरता असा मोबाईल वापरला, जो ते फक्त महत्वाच्या व्यक्तींना फोन करण्यासाठी वापरायचे. असे का? आणि तिसरी गोष्ट म्हणजे दरवाजाजवळील खुंटीला अडकविलेला दोर. खुनीने अगदी हाताशी असलेला दोर वापरायचा सोडून दूर खिडकीपाशी असलेली चादर मिरासदारांचा गळा आवळण्यासाठी का वापरली? निश्चितच कुठेतरी पाणी मुरत होते. आणखी एक गोष्ट, जी वरवर साधीशी वाटते, पण थोडे नीट पाहिले, तर विचार करायला लावते. ती म्हणजे दरवाजाजवळ पडलेला रक्ताचा सडा. खोलीच्या आतमध्ये दरवाजाजवळ रक्ताचे बरेच शिंतोडे उडाले होते आणि तेथून मिरासदारांचा मृतदेह जिथे पडलेला आढळला, तिथपर्यंत रक्ताची रेषा उमटली होती. याचा अर्थ खुनीने मिरासदारांना प्रथम दरवाजाजवळ पाडले असावे आणि त्यांचे नाक फुटून तिथे रक्त सांडले असावे. मग त्याने त्यांना खोलीच्या आत फरफटत आणले आणि चादरीने गळा आवळला. असे का घडले? खुनीला मिरासदारांना पाडण्याची गरज का भासली? आता कोणीही म्हणेल, की यामागे फार विचार करण्यासारखे काय आहे? मिरासदार जखमी व्हावेत आणि त्यांना प्रतिकार करण्याची संधी न देता त्यांचा गळा आवळता यावा म्हणून खुनीने प्रथम त्यांना पाडले असावे. पण जेव्हा आपण तो मोबाईल, खुंटीवरचा दोर आणि मिरासदारांचे दरवाजाजवळ पडणे या तिन्ही गोष्टींचा एकत्र विचार करतो, तेव्हा आपल्याला त्यांमध्ये एक समानता आढळते. अतिशय धूसर, न जाणवणारी, पण विलक्षण, अतर्क्य अशी समानता. या तिन्ही घटना तेव्हाच घडू शकतात, जेव्हा खुनीला मिरासदारांच्या खोलीत उभे राहणे शक्य नसेल..!! "

अल्फाचे ते वाक्य ऐकून माझ्यासकट सगळेचजण बुचकळयात पडले.

" नाही समजले? " सर्वांच्या चेहेऱ्यांवर नजर फिरवत अल्फा म्हणाला, " आता लक्षपूर्वक ऐका. मिरासदारांचा मोबाईल भिंतीमधील ज्या कप्प्यात ठेवला होता, तो जमिनीपासून बऱ्यापैकी उंचीवर होता आणि त्यातील मोबाईल घेण्यासाठी माणूस उभा असणे अनिवार्य आहे. पुढे, तो दरवाजाजवळील खुंटीला अडकविलेला दोर. तोदेखील हस्तगत करण्यासाठी उभे राहणे आवश्यक आहे. खाली बसून तो हाताला लागत नाही. शिवाय मिरासदारांना खुनीने प्रथम खाली पाडले, त्याचेही कारण हेच की एकदा मिरासदार खाली पडले, की त्यांना खाली बसूनच मारणे शक्य व्हावे. थोडक्यात सांगायचे झाले, तर खुनीवर कसलेतरी विचित्र बंधन होते, ज्यामुळे तो उभा राहू शकत नव्हता आणि त्याला जे काही करायचे होते, ते जमिनीशी लागूनच करता येणार होते. ही कल्पना करून जर आपण चाललो, तर त्या खोलीत घडलेल्या घटनांमागच्या अनैसर्गिकतेचा अर्थ हळूहळू आपल्या लक्षात यायला लागतो आणि काल रात्री तिथे काय घडले असावे, याचे चित्र स्पष्ट होऊ लागते.

काल रात्री दोन वाजण्याच्या आसपास मिरासदारांचा दरवाजा वाजला. बाहेर अर्थातच खुनी होता आणि तो बसलेल्या अवस्थेत होता. कारण मिरासदारांच्या खोलीत उभे राहणे शक्य नाही. मिरासदारांनी दरवाजा उघडला आणि तत्क्षणी खुनीने त्यांना पाडले. त्यामुळे मिरासदारांचे नाक जमिनीवर आपटून तिथे रक्ताचा सडा पडला. मग त्याने त्यांना आत खेचून आणले. जवळच्या बेडवरील चादर त्याने ओढली आणि मिरासदारांना ठार मारले. आता त्याला खुनाचा आळ नागेशवर आणायचा होता. त्यासाठी त्याला वरती बोलावणे आवश्यक होते. पण मिरासदारांचा मोबाईल तर वरती होता, जिथे खुनी पोहोचू शकत नव्हता. त्यामुळे त्याने त्यांच्या खिशातच असलेला दुसरा मोबाईल नागेशला मेसेज करण्यासाठी वापरला. नागेश वरती आला आणि जाळ्यात अडकला.

आता सर्वात मोठा प्रश्न हा उभा राहतो, की अशी कोणती गोष्ट होती, जी खुनीला उभे राहू देत नव्हती? असे काय त्या खोलीत होते, ज्यासाठी खुनीने सर्वकाही न उभे राहता करण्याचा खटाटोप केला?? मी जेव्हा काल रात्रीची मिरासदारांची खोली डोळ्यांसमोर

आणली, तेव्हा माझ्या डोक्यात लख्खकन प्रकाश पडला. ती गोष्ट म्हणजे त्या खोलीत असलेली खिडकी होती. दरवाजाच्या बरोबर समोर असलेली लांबलचक खिडकी. जर खालून त्या खिडकीकडे पाहिले, तर त्यातून मिरासदारांची पूर्णच्या पूर्ण खोली दिसते. मी थोडे प्रयोग करून पाहता मला लक्षात आले, की खाली गार्डनच्या पलीकडील रस्त्यावरून जर या खिडकीच्या आत पाहिले, तर आतमध्ये उभी असलेली व्यक्ती सहज दिसते. पण तीच व्यक्ती जर वाकली अथवा खाली बसली, तर खालून पाहणाऱ्याला ती दिसत नाही. ज्याअर्थी खुनी त्या खोलीत उभा राहू शकत नव्हता, त्याअर्थी त्याला नक्कीच आपण पाहिले जाऊ अशी भीती वाटत असणार. या सर्वातून एकच निष्कर्ष निघतो - तो म्हणजे काल रात्री दोन वाजता गार्डनपलीकडच्या रस्त्यावर खिडकीतून आत पाहणारे कोणीतरी उभे असले पाहिजे आणि खुनीला या गोष्टीची निश्चितपणे आधीपासूनच माहिती असली पाहिजे!! त्याशिवाय खुनी खुन करताना इतकी काळजी घेणे शक्यच नाही. "

ते ऐकून हॉलमध्ये असलेला एकन एक जण थक्क झाला होता. हे सर्वच कल्पनेच्या पलीकडील होते. अल्फा मघाशी मला जे बोलला होता, त्याचा अर्थ मला आत्ता लागत होता. अल्फा पुढे बोलू लागला,

" हा दुवा मला मिळाला आणि मी खाली रस्त्यावर थोडी तपासणी करताच मला माझा तर्क खरा असल्याचे लक्षात आले. रस्त्यावर दिव्याच्या खाली मला एका व्यक्तीच्या अस्तित्वाचे ताजे निशाण मिळाले. ते निशाण म्हणजे एका तेरा-चौदा वर्षांच्या मुलाच्या चपलांचे ठसे होते.. होय, तो संजू होता. मिरासदारांचे बागकाम करणारा पोऱ्या. काल रात्री मिरासदारांचा खुन होण्याच्या वेळी संजू खाली उभारून खिडकीतून आतमध्ये पाहत होता. तसे करण्यास त्याला मिरासदारांनीच सांगितले होते.

आपण आता या घटनेच्या शेवटच्या आणि सर्वात उत्सुकतेच्या भागाकडे वळूया. जर नागेशने खुन नाही केला, तर मग खरा गुन्हेगार कोण?? तसं पहायला गेलं तर खुपच कठीण प्रश्न होता हा. कारण खुनी इतका चालाख आहे, की त्याने एकही पुरावा मागे सोडला नव्हता. त्याने खाली उभारलेल्या संजूला चकविण्याचा खटाटोप केला खरा; पण शेवटी अशी

एक घटना घडली, ज्यामुळे मला खुनी कोण आहे हे समजायला फारतर एक मिनीट पुरले. आता काल रात्रीच्या मिरासदारांच्या खोलीकडे आपण पुन्हा जाऊया. खुनीने मिरासदारांचा खुन केला, नागेशला वरती येण्याचा मेसेजही केला. पण संजू तर अजुनही खाली उभा होताच. त्याला तेथून हटविणे आवश्यक होते. कारण त्याने नागेशला खोलीत येताना पाहिले, तर सगळेच मुसळ केरात जातील. खुनाचा आळ तर नागेशवर आणायचा होता. पण खुन करताना नागेश दिसणे शक्य नव्हते, कारण मिरासदार तर आधीच मेलेले होते. जर संजू तिथेच उभा राहिला असता, तर तो नागेश निर्दोष असल्याचा साक्षीदारच झाला असता. त्यामुळे काहीतरी करून खुनीने त्याला तेथून जाण्यास भाग पाडले. मी हिच गोष्ट संजूला विचारली. तू तेथून कधी गेलास आणि का गेलास?? तुला कोणी जायला सांगितले?? तेव्हा तो म्हणाला, की खुद्द मिरासदारांनीच खिडकीतून हात करून त्याला तेथून जाण्यास सांगितले. पण हे तर असंभव होते. कारण मिरासदार तेव्हा जिवंत नव्हतेच. मग ते संजूला जाण्याचा इशारा कसा देतील??

या प्रश्नाचे एकच उत्तर असू शकते - खिडकीतून संजूला निघून जाण्याचा इशारा देणारा दुसरातिसरा कोणी नसून खुद्द खुनीच होता!! त्याने आपला चेहरा खाली उभारलेल्या संजूला दिसणार नाही, याची पुरेपूर काळजी घेतली आणि खिडकीतून फक्त हात बाहेर काढून संजूला जाण्यास सांगितले. संजूला तो हात मिरासदारांचाच आहे, असे वाटले, कारण त्या हातावरचा शर्ट आणि घड्याळ या दोन गोष्टी मिरासदारांच्याच होत्या. हाच मुद्दा मी बरोबर उचलला आणि मला खुनी कोण आहे, हे कळून चुकले. काल रात्री खुनानंतर जेव्हा सर्वजण त्या खोलीपाशी जमले होते, तेव्हा त्यातल्या एका व्यक्तीने हुबेहुब मिरासदारांच्या शर्टाच्या रंगाचा नाईट ड्रेस घातला होता. त्यातच त्या व्यक्तीचे घड्याळाही हुबेहुब मिरासदारांसारखेच आहे. अर्थातच, नागेश वरती येईपर्यंत त्या व्यक्तीला कपडे बदलण्यास वेळ मिळाला नसणार. नागेश वरती येण्याची त्याने वाट पाहिली आणि तो खोलीत जाताच एकदम ती व्यक्ती बाहेर आली आणि नागेशला रंगेहाथ पकडण्याचा बहाणा केला.. तुमच्या हुशारीला दाद द्यायला हवी, श्री सचिन मिरासदार!!! "

सर्वांच्या नजरा सचिन मिरासदारांकडे वळल्या. सचिनने भयभीत होऊन इकडेतिकडे पाहिले.

" मी.. मी.. न्.. नाही.. " तो चाचपडत म्हणाला.

" कबूल करण्यावाचून तुमच्याकडे दुसरा पर्यायच नाहीये, सचिन. मला सुरूवातीपासूनच तुमच्यावर संशय होता. बरोबर नागेश खोलीत असताना तुम्ही बाहेर यावे, तेही इतक्या रात्री - विचार करायला लावणारी गोष्ट होती. शिवाय इतका विचारपूर्वक आणि कौशल्याने खुन करणारा माणूस चांगला प्रशिक्षित असला पाहिजे, असा मी विचार केला होता. तुम्ही एनसीसी चे प्रशिक्षक होता, असं मी ऐकलंय. त्यामुळे अशी चपळता फक्त तुम्हीच दाखवू शकला असता. साहजिकच मी खुनी म्हणून तुम्हालाच धरून चाललो होतो. संजूने त्या खिडकीतील हाताबद्दल सांगितल्यानंतर माझी खात्रीच पटली, की मिरासदारांचा खुन तुम्हीच केलेला आहे. आपण प्रथम जेव्हा बंगल्याच्या दारात भेटलो, तेव्हा तुमचं घड्याळ मी पाहिलं होतं आणि ते अगदी माधव मिरासदारांसारखंच होतं. शिवाय काल रात्रीचा तुमचा पेहरावदेखील मिरासदारांसारखाच होता. त्यामुळे हे स्पष्टच होतं, की खुन तुम्हीच केलेला आहे. आता तुम्ही सत्य कबूल करावं, हेच उत्तम. "

सचिन खुपच भेदरलेला होता. त्याला दरदरून घाम फुटला होता. त्याच्या तोंडातून शब्द फुटत नव्हते. विवेकने चिडून त्याला विचारले, " हा मुलगा जे बोलतोय, ते खरं आहे का?? बोल!! तू मारलंस बाबांना?? "

" नाही.. मी.. कशावरून..मी.. नाही.. "तो असंबद्ध बडबडला.

" तुझा गुन्हा बऱ्याबोलाने कबूल कर सचिन.. नाहीतर माझ्याकडे तुझ्याकडून सत्य वदवून घेण्याचे दुसरेही मार्ग आहेत. " प्रधान सर आपल्या शर्टाच्या बाह्या वरती सरकवत म्हणाले. त्यांचा करडा आवाज ऐकून सचिनचा उरलासुरला धीर संपला आणि तो मटकन खाली बसला.

" हो.. हो.. मी.. मीच मारलंय त्यांना.. "तो थरथर कापत म्हणाला. ते ऐकताच विवेकची तळपायाची आग मस्तकात गेली आणि तो सचिनच्या दिशेने धावला.

" तू आपल्या वडिलांना मारलंस!! निर्लज्ज, क्रूर माणसा!! तुला तुझ्या कृत्याची शिक्षा मिळेल.. मी तुला सोडणार नाही.. "

त्याला सर्वांनी मोठ्या कष्टाने मागे ओढले. त्याचा राग फारच अनावर झाला होता. त्याला शांत करण्यात काही मिनिटे गेली. सचिनने आपला चेहरा हातांनी झाकून घेतला. त्याने खुन केलाय, यावर कोणाचाच विश्वास बसत नव्हता.

" शांत हो विवेक. त्याला शिक्षा ही होणारच आहे. पण त्याआधी त्याने हे कृत्य का केले, यामागचे कारण जाणून घेणे आवश्यक आहे." प्रधान सर म्हणाले, "सचिन, तू हे का केलंस?? अशी कोणती गोष्ट आहे, जिने तुला स्वतःच्या वडिलांना ठार मारण्यास भाग पाडले?"

तो काहीच बोलला नाही. त्याला काय करावे, हे सुचतच नव्हते.

"हे बघ. तुला बोलण्याची ही शेवटची संधी आहे. पोलीस आता येतच असतील. तू बोललास तर ठिक, नाहीतर तुझ्याकडून जबरदस्तीने बोलवून घ्यावे लागेल. " प्रधान म्हणाले.

" त्यांना मी नाही मारलं!! " अखेर सचिन बोलला, " त्यांच्या कारस्थानी स्वभावानेच त्यांना मारलंय!! "

" म्हणजे?? काय म्हणायचंय काय तुला?? " विवेकने विचारले.

" यातील फारशी कोणाला माहिती नाहीये. पण आमचे बाबा नक्की काय होते, हे मी चांगलाच जाणून आहे." सचिन म्हणाला, "त्यांनी धंद्यात इतका पैसा काय सरळमार्गाने कमविला असेल असे तुम्हाला वाटते??"

"तुला म्हणायचंय.. की.. " महेश भीत भीत म्हणाले.

" हो. त्यांनीही खूप गैरव्यवहार केलेला आहे. तेही नागेशच्या मदतीने. "

" काय?? " तिथे उपस्थित असलेल्या सर्वांनाच धक्का बसला.

" होय. " सचिन म्हणाला, " मला यातले काहीच ठाऊक नव्हते ; कारण बरीच वर्षे मी घराच्या बाहेरच होतो. मग इथे आल्यानंतर धंद्यात विवेकला थोडी थोडी मदत करायला लागलो. मला एक गोष्ट प्रकर्षाने जाणवली. ती म्हणजे बाबा आणि नागेशच्या होणाऱ्या सततच्या भेटीगाठी. आमच्या ऑफिसमध्ये त्यांचं बऱ्याचदा रात्री उशीरापर्यंत बोलणं चालायचं. मी आणि विवेक लवकर घरी यायचो. हे दोघे इतका वेळ काय बोलतात, हे पाहण्यासाठी आम्ही दोघे एक दिवस कोणाच्याही नकळत मागे थांबलो आणि त्यांचे बोलणे ऐकले. तेव्हा आम्हाला खुपच धक्कादायक अशा गोष्टी समजल्या. धंद्यात फायदा कमवण्यासाठी गैर कामे करण्यासाठी बाबांनी नागेशचा उपयोग करून घेतला होता आणि आता तो त्या बदल्यात आमच्या प्रॉपर्टीमधला हिस्सा मागत होता. बाबा त्याला राजी होत नव्हते. ही घटना म्हणजे आमच्यासाठी फार मोठा धक्का होता. बाबा पहिल्यापासूनच आमचे आदर्श होते आणि ते असे काही करतील, असा मी स्वप्नातसुद्धा विचार केला नव्हता. तेव्हापासून आमचा बाबा आणि नागेश दोघांवरही राग निर्माण झाला. विवेक तर भयंकर चिडला होता ; पण त्याला बाबा फारच जवळचे असल्यामुळे तो शांत राहिला. आम्ही कोणालाच काही बोललो नाही.

आम्ही यात फार लक्ष न घालता आमचे काम सुरू ठेवले. पण दोन दिवसांपूर्वी मी माझ्या वडीलांना नागेशला वचन देताना ऐकले, की आमच्या प्रॉपर्टीमधला अर्धा हिस्सा ते त्याला देतील. ते ऐकून माझी संतापाने लाही लाही झाली. आम्ही धंदा सांभाळण्यासाठी दिवसरात्र राबत होतो आणि हा सर्व आयतेच घेऊन खाणार होता. अखेर मी त्या दोघांचाही काटा काढण्याचे ठरविले. बाबा त्यांच्या पंच्याहत्तरावा वाढदिवस झाल्यावर मृत्युपत्र तयार करणार होते, म्हणजे कालच. रात्री बाबा आणि नागेशची वादावादी झाली नसून मृत्यूपत्राबाबत चर्चा झाली होती. ते मी ओळखले आणि काही होण्याआधीच बाबांचा खेळ

संपविला. त्यानंतर नागेश त्यांच्या खुनाच्या आरोपात फसेल, अशी सगळी व्यवस्था करून ठेवली. मला बाबांची सवय ठाऊक होती आणि मला खात्री होती, की ते कोणालातरी पाळतीवर ठेवणार. थोडे निरीक्षण करताच मला खाली रस्त्यावर संजू उभा असल्याचे ध्यानात आले. आता काम आणखीनच अवघड झाले होते. पण मी एकदा ठरवले की ठरवले. त्यामुळे मी व्यवस्थित बेत आखून बाबांचा खुन केला आणि नागेशलादेखील अडकविले.

माझा डाव सफल झालाय, असे मला काही वेळापुर्वीपर्यंत वाटत होते. पण प्रधान सर आणि अल्फाच्या इथे असलेल्या उपस्थितीकडे मी कानाडोळा केला आणि इथेच माझी सर्वात मोठी चूक झाली. तुम्ही इतक्या खोलवर जाऊन विचार कराल, असे मला कधीच वाटले नव्हते. तुम्ही खरेच ग्रेट आहात!! तुमच्या चातुर्याला आणि शोधकार्याला दाद द्यावी तेवढी थोडीच आहे. मला मान्य आहे की मी गुन्हा केलाय. पण हे आपल्यासाठीच होते, विवेक. मी ही संपत्ती त्या दुष्टाच्या हाती लागू देणार नव्हतो. त्यासाठी हे करणे आवश्यक होते. आणि ते मी केले. मला जे बोलायचे होते, ते आता बोलून झाले आहे. आता तुम्हाला जे योग्य वाटेल ते करा. "

" शिक्षा तर तुला होणारच. तू स्वतःला न्यायव्यवस्थेच्या वरचे समजलेस आणि न्याय करायला निघालास. पण शेवटी गुन्हा तो गुन्हाच. आता तुझा न्याय न्यायालयातच होईल. घेऊन जा त्याला!! " प्रधान सर ओरडले. बंगल्याच्या बाहेर थांबलेले पोलीस आत आले आणि सचिनला घेऊन गेले. विवेकने हातपाय गाळले आणि तो अश्रू ढाळू लागला. महेशने त्याला सावरले.

" रडू नकोस. आता सगळी जबाबदारी तुम्हा दोघांवर आहे. " प्रधान सर त्या दोघांना म्हणाले, " इथून पुढे नीट रहा आणि चांगल्या मार्गाने धंदा चालवा. जी चूक तुमच्या वडिलांनी केली, ती तुम्ही करू नका. त्यात तुमचंच भलं आहे. "

त्या दोघांनी मान डोलावली.

" चला. आता निघण्याची वेळ झाली. सर्वांनी गेलं तरी हरकत नाही. " प्रधान सर म्हणाले.

*

संध्याकाळी उशिरा आम्ही परत सांगलीला जायला निघालो. बराच वेळ कोणीच काही बोलत नव्हते. माझा वीकेंड इतका सनसनाटी होईल, अशी मी कल्पनाच केली नव्हती. मी कालपासूनचे सगळे प्रसंग मनात घोळवत राहिलो. अल्फा गाडीतून बाहेर पाहत होता आणि प्रधान सरही कसल्यातरी विचारांत मग्न होते.

"माधवने असे काही केले असेल, असे वाटले नव्हते. " अखेर प्रधान सरच बोलले, " तो माझा फार जुना मित्र होता आणि आम्ही एकमेकांना चांगले ओळखत होतो. पण तो पैसे मिळविण्यासाठी वाईट मार्गांचा अवलंब करत होता, हे मला ठाऊक नव्हते. काही काही वेळा माणसे वरून दिसतात तशी आतून असत नाहीत, हेच खरे..!! "

" खरंय. " अल्फा म्हणाला. पुन्हा दोन मिनिटे शांतता, आणि एकदमच अल्फाला आठवले, " सर, आपली पैज?? या सगळ्या गोंधळात आपण त्याबद्दल विसरूनच गेलो!! "

" अरे हो, खरंच की!! " प्रधान सर स्मितहास्य करीत म्हणाले, " आपले पंच तर इथेच बसलेत. आणि पैज कोणी जिंकली आहे, हे फक्त त्यांनाच ठाऊक आहे. "

त्या दोघांनीही माझ्याकडे पाहिले.

" त्याला कशाला विचारायला हवंय. पैज मीच जिंकलेली आहे. त्याला पहिला मेसेज माझाच गेला होता. विचारा ना त्याला. तो सोबतच होता माझ्या. " अल्फा रुबाबात म्हणाला. मी प्रधान सरांकडे पाहिले. आम्हा दोघांनाही एकदमच हसू फुटले. अल्फा काहीच न कळून आमच्याकडे पाहू लागला.

" काय चाललंय तुमचं? का हसताय तुम्ही?? "

मी माझ्या मोबाईलचा मेसेज बॉक्स उघडून अल्फाला दाखविला. त्यात प्रधान सरांचा मेसेज अल्फाच्या बराच वेळ आधी आलेला त्याला दिसला. ते पाहून अल्फा एकदम खट्टू झाला.

" म्हणजे.. यावेळी पण.. "

" यावेळीपण मीच जिंकलो. " प्रधान सरांनी त्याचे वाक्य पूर्ण केले. आम्ही हसू लागलो.

" मला प्रधान सरांचा मेसेज आपण संजूला भेटायला निघालो होतो, तेव्हाच आला होता. पण मी तो जेव्हा तू मेसेज केलास, तेव्हाच पाहिला. मला तेव्हाच खुनी कोण आहे, हे कळाले आणि पैज कोणी जिंकली आहे, हेही कळाले. पण मी मुद्दामच काही बोललो नाही. तुझ्या आनंदावर विरजण नको म्हणून म्हटलं थोडा वेळ राहुदे खुष. नंतर सांगू खरं काय ते. " मी म्हणालो.

" बरं बरं.. असूदे.. " अल्फा म्हणाला, " एवढं हसण्यासारखं काय आहे त्यात? तुम्ही तर माझ्यापेक्षा मोठे आहात. अनुभवी आहात. तुम्ही जिंकणारच की.. "

" वा रे वा!! पैज लावण्याच्या वेळी तर असं काही सुचलं नाही!! आणि हरल्यावर मी एकदम मोठा झालो का!! " प्रधान सर डोळा मारत म्हणाले, " लक्षात ठेव अल्फा, 'बाप बाप होता है'!! "

***

## समाप्त



सौरभ गणेश वागळे

इंजिनिअर, बजाज ऑटो लिमिटेड,

वाळूज, औरंगाबाद.

फोन/व्हॉट्सॲप : +918983234042

मेल : sourabhwagale@yahoo.com

प्रतिक्रिया नक्की कळवा!!

धन्यवाद

माझं हे दुसरं पुस्तकसुद्धा शेवटपर्यंत वाचलंत ना तुम्ही!

माझं पहिलं पुस्तक आवडलं तुम्हाला. मला आलेल्या मेल्स आणि फ़ोन यांनी मी अक्षरशः न्हाऊन निघालो. माझा उत्साह दुप्पट झाला. आत्मविश्वास वाढला. आणि माझ्याबरोबरच अल्फ़ाचा उत्साहसुद्धा वाढला. आता तो सपाटून कामाला लागला आहे. आता या वेळी देखावा आणि अंगठी या कथा कशा वाटल्या? आधी डिटेक्टिव्ह अल्फासोबत तुम्हीही रत्नजडित खंजिराचा पाठलाग करण्याचे थ्रील अनुभवले असेल. आता यावेळी तुम्ही मिरासदारांच्या बंगल्यातला थरार अनुभवला का? जर तुम्हाला ही कथा आवडली असेल, तर मला नक्की कळवा. माझा फोन नं. 8983234042. तुम्ही मला व्हॉट्सअॅपवर भेटू शकता, फेसबुकवर शोधू शकता किंवा मला sourabhwagale@yahoo.com वर मेलदेखील करू शकता. मी आपला मित्र अल्फाच्या आणखी नवीन नवीन करामती लिहीण्याचा नक्की प्रयत्न करेन. फक्त तुमचा feedback द्यायला मात्र विसरू नका. तुमच्या सूचनासुद्धा मला अत्यंत मोलाच्या असतील.

लवकरच भेट होईल, अशी अपेक्षा.

**-सौरभ वागळे**

सौरभ वागळे हा ई साहित्यचे नवीन दमाचा लेखक. सांगलीच्या वालचंद कॉलेज ऑफ इंजिनिअरिंगमध्ये B.Tech. Mechanical stream मधून नुकताच शिकून बाहेर पडलेला. त्याच्या पुस्तकाबद्दल आपलं प्रांजळ स्पष्ट मत आपण कळवावं ही विनंती.

**-प्रकाशक**

# ई साहित्य प्रतिष्ठान

मित्रहो , सहजासहजी फ़ुकट काहीच मिळत नाही. न आरोग्य न धन न संपदा. काहीही मिळवायचं तर संघर्ष आणि श्रम करावेच लागतात. “गोलमाल” करून, मेकओव्हर सर्व काही मिळवता येतं असा गैरसमज माध्यमांद्वारे सर्वत्र पसरवला जात आहे. झटपट श्रीमंती, आठ दिवसांत गोरेपणा, महिन्याभरात लांबसडक केस, एक हनुमान यंत्र गळयात बाधले की आजारांपासून मुक्ती अशा जाहिराती माथी मारल्या जात आहेत. अशा वेळी पुस्तकं वाचून माणूस “जमिनीवर” येतो. फ़ुकट काहीच मिळत नसतं. प्रत्येक गोष्टीसाठी कुणाला न कुणाला कष्ट पडतात. कधी आपल्याला, कधी आपल्या आईवडलांना, गुरूंना, तर कधी समाजातील इतरांना.

ई साहित्य प्रतिष्ठानची पुस्तकं विनामूल्य मिळतात. पण ती लिहिण्यासाठी लेखकांचे कष्ट व बुद्धी लागलेले असतात. आणि या एकेका पुस्तकाची किंमत म्हणुन लेखक हजारो लाखो रुपये मिळवू शकतात. पण मराठी वाचकांना विनामूल्य पुस्तकं मिळावी, व मराठीत वाचन संस्कृती वाढावी म्हणून असंख्य लोक प्रयत्न करीत आहेत. या प्रयत्नांत ई साहित्य प्रतिष्ठान व हे सर्व लेखक सहभागी आहेत. आपण या अभियानात सहभागी झालात का?

आपण ई साहित्य प्रतिष्ठानचे VIP सभासद झालात का?

VIP सभासद बनणं अगदी सोप्पं आहे.

आपल्या ओळखीच्या दहा मराठी लोकांचे मेल आय डी कळवा आणि बना VIP सभासद.

एका दमात तीन कामं.

1. पहिलं म्हणजे तुम्ही VIP सभासद बनता. तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानचं पुस्तक ई मेलवर सर्वात आधी मिळतं. त्यांच्या कार्यक्रमाचं आमंत्रण मिळतं. त्यांच्या योजनांची माहिती मिळते. त्यांच्या कामात स्वतः सहभागी होण्याची संधी मिळते.

2. ज्या दहा किंवा अधिक मित्रांना तुमच्यामुळे फ़्री पुस्तकं मिळतात ते खुश होतात. त्यांना त्यांच्या आवडीची पुस्तकं मिळाली की ते इतर लोकांना तुमच्याबद्दल सांगतात. त्यांच्यासाठी तुम्ही म्हणजेच ई साहित्यचे प्रतिनिधी बनता.

3. यातून तुम्ही मराठी भाषेच्या संवर्धनाला अमूल्य असा हातभार लावता. आमचा उद्देश आहे मराठीतल्या सहा कोटी साक्षरांना वाचक बनवणं. आणि हे लक्ष्य साध्य करणं हे केवळ आणि केवळ मराठी लोकांना त्यांच्या भाषेवर असलेल्या प्रेमातूनच शक्य आहे. आपल्या भाषेचं राज्य व्हावं म्हणून १०६ हुतात्मे झाले. आपल्या भाषेनं राजा व्हावं म्हणून आपण एक दहा-वीस ई मेल आयडी देणारच ना! वाचनाची आवड असो वा नसो. फ़क्त मराठी साक्षर अशा दहा लोकांचे ई मेल पत्ते पाठवा. त्यांना वाचनाची आवड आपोआप लागेल. आपणच लावू. लावूच लावू. करूनच दाखवू.

आहे ना : एक दम : तीन कामं.

संपर्क साधा : esahity@gmail.com

ही सेवा पूर्णपणे निःशुल्क आहे. त्यामुळे आपले मित्र आपल्यावर खुश होतील. शिवाय आम्ही ही खात्री देतो की या ई मेल्सचा वापर फ़क्त आणि फ़क्त मराठी साहित्य पाठवण्यासाठीच केला जाईल. इतर कसल्याही जाहिराती पाठवून त्यांना त्रास दिला जाणार नाही. तेव्हा लवकरात लवकर आपल्या माहितीतल्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला द्या.

अधिक माहितीसाठी, आम्ही कोण ते जाणून घेण्यासाठी एकदातरी www.esahity.com या वेबसाईटला भेट द्या.

आपल्या पत्राची वाट पहात आहोत.

धन्यवाद

आपले नम्र

टीम ई साहित्य प्रतिष्ठान

